"श्री सयाजी-बालज्ञानमाला"-पुष्प ४८ वें.

( चरित्र-गुच्छ )

# महाराणा प्रताप.

रूपांतरकार

परशुराम गोविंद काटदरे, बी. ए.
ॲसिस्टंट मास्तर, बडोदें हायस्कूल-बडोदें.

प्रकाशक

एम्. सी. कोठारी,
कापडीपोळ, रावपुरा-बडोदें.

इ. स. १९२४ } किंमत { प्रथमावृत्ति
संवत् १९८० } रु. ०-६-० { प्रत ५००

# जाहिरात.

आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें श्रीमंत सरकार महाराजसाहेब श्रीसयाजीराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादुर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई., एल. एल. डी. यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रकम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून प्राथमिक शिक्षण संपादन करून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांना बोधप्रद होईल असें सरळ आणि सोप्या भाषेंत विविधविषयावरील लोकसाहित्य तयार करून तें " श्री सयाजीबालज्ञानमाले " तर्फे प्रसिद्ध करण्याची योजना केली आहे.

या योजनेस अनुसरून रा. रा परशुराम गोविंद काटदरे बी. ए. यांजकडून महाराणा प्रताप यांचें चरित्र तयार करवून सदरहु मालेच्या चरित्र--गुच्छाचें अठ्ठेचाळिसावें पुष्प विद्याधिकारी कचेरींतील भाषांतर शाखेच्या ठरलेल्या धोरणानें संशोधित करून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

| | | |
|---|---|---|
| भाषांतर शाखा,<br>विद्याधिकारी कचेरी,<br>बडोदें.<br>ता. ३१-५-१९२८. | ज. पु. जोषीपुरा.<br>भा. म. | नं. के. दीक्षित.<br>विद्याधिकारी.<br>बडोदें राज्य. |

# प्रस्तावना.

आपल्या मराठी भाषेत लहान मुलांनां उपयोगी असें वाङ्मय फारच अल्प प्रमाणावर आहे. त्याची आज बरीच उणीव आहे. बडोदें राज्यांत मे. रा. रा. विद्याधिकारी साहेब यांनीं जी 'बालज्ञानमाला' सुरू केली आहे त्यायोगानें बरीचशी उणीव भरून निघेल अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं.

या बालज्ञानमालेचा मुख्य उद्देश लहान मुलांनां हंसत खेळत विविध विषयांचें ज्ञान प्राप्त करून देणारें वाङ्मय निर्माण करणें हा आहे. त्याला अनुसरून रा. रा. रमणलाल वसंतराम देसाई, एम्. ए. यांनीं 'महाराणा प्रताप' या नांवाचें एक पुस्तक गुजराथी भाषेत लिहिलें आहे, त्याचें मराठींत रूपांतर करण्याचें मजकडे सोंपविण्यांत आल्या-वरून हा माझा अल्प प्रयत्न माझ्या बाळमित्रांपुढें सादर करीत आहे.

विषयाची मांडणी मूळ पुस्तकांत ठरून गेल्यामुळें त्या मांडणीला अनुसरूनच भाषांतर करणें भाग पडलें. मूळ पुस्तकाचें शब्दशः भाषांतर न करितां योग्य ठिकाणीं फेरफार करून लहान मुलांना सरळ, सुबोध व वाचनीय होईल असें करण्याचा प्रयत्न केला आहे. या कार्याचें यश बालमित्रांच्या हें पुस्तक वाचनाच्या गोडीवर अवलंबून आहे.

या मालेच्या हातून पुष्कळ उपयुक्त पुस्तकें निर्माण होवोत अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करून, ज्यांच्या योगानें ही माला स्थापिली गेली त्या आपल्या परमकृपाळु श्रीमंत महाराज साहेबांचे व ज्यांनीं या मालेस योग्य स्वरूप दिलें त्या विद्याधिकारी साहेबांचे मी सर्व बालवृंदातर्फे मनःपूर्वक आभार मानितों.

परशुराम गोविंद काटदरे.

---

श्री.

# महाराणा प्रताप.

धैर्यशाली व पराक्रमी पुरुषांचीं चरित्रें कोणाला आवडत नाहींत? आपल्या हिंदुस्थान देशांत अनेक मोठमोठीं माणसें होऊन गेलीं आहेत, त्यांना आपण मोठे कां ह्मणतों हें त्यांचीं चरित्रें वाचून किंवा ऐकून आपणास सहज समजण्यासारखें आहे. शिवाय त्यांच्या चरित्रांचा अभ्यास केल्यानें आपलें चरित्रही थोडें फार त्यांच्या चरित्रा इतकें मोठें व तेजस्वी होण्याचा संभव असतो. या जगांत येऊन कांहींएक पुरुषार्थ न करतां भित्रेपणानें आपले आयुष्याचे दिवस घालविणें ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे, व अशा रीतीनें आपलें जीवित निस्तेज व सत्वहीन न व्हावें ह्मणून प्रत्येक मनुष्यानें शूरवीर पुरुषांची चरित्रें उदाहरण ह्मणून आपल्या डोळ्यांसमोर नेहमीं ठेविलीं पाहिजेत.

प्रताप हा एक महा पराक्रमी योद्धा होऊन गेला. त्याच्यावर रोमांच उभे करणारीं अशीं अनेक संकटें व दुःखें कोसळलीं; तरी पण त्यानें स्वधर्म, स्वदेशाभिमान आणि आपलें सत्यव्रताचरण कधींही सोडिलें नाहीं. जीं माणसं संकटें ओढवलीं असतां घाबरून जाऊन सत्याची कांस सोडून देतात तीं कधींही मोठेपणास चढत नाहींत.

अकबर बादशाहाचें नांव आज सर्वतोमुखीं आहे. दिल्लीच्या गादीवर त्याच्यासारखा चांगला मुसलमानी बादशाहा कोणीच झाला नाहीं. ज्याप्रमाणें हिंदू लोकांमध्यें राम, नळ, युधिष्ठिर इत्यादि सत्यवादी व प्रजाकल्याणदक्ष राजांना पूज्य मानण्यांत येऊन त्यांचीं नांवें सर्वत्र ऐकण्यांत येतात, त्याचप्रमाणें अकबर सुद्धां प्रजाहितरत व पूज्य राजा या नात्यानें मुसलमानी राज्याच्या इतिहासांत फार प्रख्यात होऊन गेला.

हा अकबर बादशहा इसवी सनाच्या सोळाव्या शतकांत दिल्लीच्या गादीवर विराजमान झाला. त्याचा आजा बाबर यानें हिंदुस्थानांत मोंगल राज्याची स्थापना

केली होती आणि प्रतापाचा आजा राणा संग हा मुसलमानी सत्तेचा नाश करून हिंदुराज्याची स्थापना करण्याकरितां बाबराच्या विरुद्ध मोठें सैन्य घेऊन आला होता. फत्तेपूर सिक्रीच्या रणमैदानांत बाबराच्या हाताखालील मुसलमानी सैन्य व राणा संगाच्या हाताखालील रजपूत सैन्य समोरासमोर उभें राहिलें. दोन्ही सैन्यांत तुंबळ युद्ध माजलें. या लढाईत राणा संगानें अतुल पराक्रम दाखविला. त्याचें सैन्यही इतक्या शौर्यानें लढलें कीं मोंगल सैन्याचा पराभव निश्चितच होता. परंतु ऐन आणी बाणीच्या प्रसंगीं चंदेरीचा राजा रायसेन यानें आपला सरदार संग याचा हीं विश्वासघात करून बाबरच्या सैन्यास जाऊन मिळाला. सर्वच बाजू उलटली. रजपुतांनां जयाच्या ठिकाणीं पराजय स्पष्टपणें दिसूं लागला. त्यांनीं अलौकिक शौर्य दाखविलें. राणा संग याच्या शरीरावर अनेक जखमा झाल्या होत्या तरी त्यानें लढणें थांबविलें नाहीं. सरते शेवटीं त्याला हार खावी लागली; आणि बाबर यास मोंगल राज्याची स्थापना करण्यांत यश आलें. विश्वासघात करून नीचपणानें

आपल्या शत्रूस जाऊन मिळणाऱ्या माणसापासून हिंदुस्थान देशास किती तरी असह्य अशा गोष्टी सहन कराव्या लागल्या आहेत!

बाबराचा मुलगा हुमायून याच्या वेळेस शीरशाह नांवाच्या एका पठाण सरदारानें दिल्लीची गादी जिंकून घेतली, आणि हुमायूनाला पुष्कळ वर्षे हिंदुस्थानाच्याबाहेर दुःखांत दिवस काढावे लागले. सरतेशेवटीं शीरशाहाच्या वंशजापासून आपलें गमावलेलें राज्य त्यानें परत मिळवून घेतलें. परंतु तो जास्त दिवस सुखोपभोग घेण्यास जिवंत राहिला नाहीं. आरसपानी शिडीवरून खालीं उतरत असतां त्याचा पाय सरला व त्यानेंच त्याचा अंत झाला. त्याच्या नंतर जो गादीवर आला तोच त्याचा पराक्रमी पुत्र अकबर होय.

ज्याप्रमाणें आपण प्रतापाला महान् ह्मणतों त्याचप्रमाणें अकबरालाही महान् ह्मणणें आपणास भाग आहे. राज्य करणें ही कांहीं लहानसहान गोष्ट नव्हे. त्यांतल्यात्यांत लहान वयांत, आयुष्याच्या पहिल्या पंचविशींत,

अनेक शत्रूंनीं सर्व बाजूंनीं घेरलें असतां, शत्रूंचा पराजय करून राज्य सुव्यवस्थितपणानें चालविणें आणि प्रजेची प्रीति संपादन करणें या सर्व गोष्टी अंगीं मोठे गुण असल्याशिवाय कधींही होऊं शकत नाहीत. अकबरानें आपल्या बालवयांतच आपल्यावर वारंवार आलेल्या संकटांतून पार पडून, शत्रूंचा पराजय करून, आपल्या अंगच्या सद्गुणांनीं प्रजेचें मन आकर्षण करून घेतलें म्हणूनच आपण त्याला महान् ही पदवी दिली पाहिजे.

अकबराचें वय लहान असल्यामुळें त्याचे नातेवाईक व सरदारसुद्धां आपापला स्वार्थ साधण्याच्या युक्त्याप्रयुक्त्या योजूं लागले होते. अकबराच्या ऐवजीं दुसरा एखादा कमी शूर, धूर्त, व कर्तृत्ववान् राजा गादीवर आला असता तर त्याला राज्य करणें मुळींच शक्य झालें नसतें. अशा प्रकारची त्या वेळची हिंदुस्थानाची स्थिती होती. परंतु अकबर तेरा वर्षांचा होता तरी त्यानें हळुहळु अजमीर, ग्वाल्हेर, बऱ्हाणपूर इत्यादि शहरें जिंकून घेतलीं. बंगाल आणि गुजरात हे प्रदेश आपल्या अमलाखालीं आणिले; ओरीसा, काश्मीर,

सिंध आणि कंदाहार हीं शहरें सर केलीं; शिवाय दक्षिणेंतीलही कांहीं प्रदेश आपल्या स्वाधीन करून घेतला. त्यावेळपर्यंत दुसऱ्या कोणत्याही मुसलमान राजानें हिंदुस्थानाच्या एवढ्या मोठ्या प्रदेशावर आपली ध्वजा फडकाविली नव्हती.

यावरून सहज कळून येईल कीं, वयोमर्यादा व कर्तबगारी यांमध्यें फारसा संबंध नसतो. लहान वयांतही मनुष्य कर्तृत्ववान् व जगताला उपयोगी होऊं शकतो. श्रीरामचंद्र वनवासांत गेले त्या वेळेस त्यांचें वय फार लहान नव्हतें का ? श्रीकृष्णांनीं आपल्या बाळपणांतच अनेक राक्षस मारून टाकिले. गौतमबुद्धांनीं जगताचें दुःख निवारण्याकरतां राज्यपद व सुखसंपत्ति यांचा त्याग केला तोही त्यांच्या तारुण्याच्या सुरुवातींतच. शिकंदरानें आपल्या वयाच्या केवळ बत्तिसाव्या वर्षींच जगताचा बराच मोठा भाग पादाक्रांत केला होता. श्रीशंकराचार्यांनीं आपल्या अलौकिक बुद्धिप्रभावानें मोठमोठ्या पंडितांशीं वादविवाद करून त्यांना हरविलें हेंही

त्यांच्या अल्पवयांतच. याशिवाय वरील गोष्टीस पुष्टी देणारीं अनेक उदाहरणें सांपडतील. तेरा वर्षांच्या अकबरानें दिल्लीच्या गादीवर बसून जवळजवळ पन्नास वर्षें राज्योपभोगांत घालविलीं, या समयांत त्याचीं अठ्ठावीस वर्षें तर सतत लढण्यांतच गेलीं.

हे सर्व विजय संपादन करण्यास अकबरानें एक फार नामी युक्ति शोधून काढिली होती. त्याच्या जवळ मोंगल सैन्य फार थोडें होतें. दुसऱ्या प्रकारचे मुसलमान लोक विश्वास ठेवण्यालायक नव्हते. अशा स्थितींत त्यानें रजपूत राजांना आपल्याकडे वळवून घेतलें. रजपुतासारखे पराक्रमी व निमकहलाल मित्र मिळविणें फार कठीण होतें, तरी पण त्यांची प्रीति आपणास संपादन करतां आली तर आपणास विजयही मिळवितां येतील व आपल्या राज्यास बळकटी पण आणतां येईल हें तो जाणून होता.

प्रथमतः तो जोधपूराचा राजा मालदेव याच्यावर चालून गेला. मालदेव हरला; परंतु अकबरानें एकदम त्याच्याशीं मित्रत्वाचें नातें जोडलें व ही दोस्ती कायम

राहण्याकरितां मालदेवाची मुलगी जोधबाई इच्याशीं स्वतः लग्न लाविलें. अशाच रीतीनें जयपूरचा राजा भगवानसिंह याच्या मुलीशीं आपला मुलगा सलीम याचें लग्न लाविलें. याप्रमाणें लहानमोठ्या रजपूत राजांशीं शरीरसंबंध व सख्य जोडिलें. या राजांना व त्यांच्या राजपुत्रांना अकबर फार मान देत असे; आणि त्यांची धार्मिक बुद्धि बिलकुल दुखवणार नाहीं याविषयीं तो फार खबरदारी घेत असे. हरएक प्रकारें त्यानें रजपुतांना खूष ठेविलें आणि उलट रजपुतांनींही राजनिष्ठेनें अकबरास अनेक राज्यें जिंकून दिलीं आणि त्याच्या कीर्तींत भर घातली.

हीं सर्व रजपूत राज्यें एकमेकांपासून स्वतंत्र तर होतीं; परंतु तीं सर्व मेवाडाच्या राजाचें आधिपत्य मान्य करीत असत. मेवाड देश हा राजस्थानामध्यें सर्वांत श्रेष्ठ होता आणि तेथील राजाची मानप्रतिष्ठा इतर सर्व राजे ठेवीत असत. राजस्थानावर कोणतेंही संकट ओढवलें तर सर्व रजपूत राजे एकत्र होत असत. सर्वांचें नेतृत्व मेवाडाच्या राजास मिळत असे आणि त्याच्या हुकुमांत सर्वांनां रहावें लागे.

मेवाडाचा इतिहास जितका रसभरीत आहे तितका दुसऱ्या कोणत्याही देशाचा नसेल. मेवाड देशांत पुष्कळ पराक्रमी राजे होऊन गेले आहेत. त्यांचे पराक्रम वाचतांना हल्लींसुद्धां आपल्या अंगांत वीरश्रीचें वारें भरतें. तेथील राण्यांनीं व राजकन्यांनीं इतके अलौकिक पराक्रम केले आहेत कीं ते वाचून आपण आनंदानें आश्चर्यचकित झालेंच पाहिजे. मेवाडाच्या कोणत्याही रजपुताला मरण ह्मणजे कःपदार्थ वाटत असे. वाटेल तितके शत्रू जरी चाल करून आले तरी त्यांना आपली पाठ दाखावणें ही तर अत्यंत लज्जास्पद गोष्ट समजली जात असे. जिंकू किंवा शत्रूला तोंड देऊन मरूं, अशीच त्यांची प्रतिज्ञा असे.

मेवाडाचे राणे हे सूर्यवंशी सिसोदिया कुलांत जन्मलेले असें म्हणतात. प्राचीन काळीं राम आणि सत्यवक्ता हरिश्चंद्र हे सूर्यवंशी राजे होऊन गेले. पुराणकाळीं गुजराथेंत वल्लभीपूर नांवाचें एक साम्राज्य होऊन गेलें. तेथील शेवटचा राजा शिलादित्य म्लेंछ लोकांबरोबर युद्ध करीत असतां मारला गेला आणि वल्लभी राज्य छिन्नविच्छिन्न झालें. ही

उलथापालथ झाली त्यावेळेस महाराजा शिलादित्य याची पुष्पवती नांवाची एक गरोदर राणी आपल्या बापाच्या घरीं होती. तेथून वल्लभीपुरास येत असतां शिलादित्याच्या मृत्यूची वार्ता तिच्या कानावर आली. अत्यंत दुःखित होऊन ती परत फिरली आणि एका गुहेंत राहून आपल्या आयुष्याचे दिवस कंठूं लागली. त्याच गुहेंत तिला एक पुत्ररत्न झालें. नंतर आपल्या मुलाला एका कमळा नांवाच्या ब्राम्हणकन्येच्या हवालीं करून ती सती गेली. या बाळकाचा जन्म गुहेंत झाल्यामुळें कमळेनें त्याचें नांव गुह असें ठेविलें. या गुहानें ईडरचें राज्य जिंकून घेतलें. आणि आपला महिमा वाढविला. गुह या नांवावरून त्याच्या वंशजांना गहेलोट असें म्हणतात. गुहापासून आठव्या पिढींत जन्मलेला राजा नागादित्य याला ईडराच्या भिल्ल लोकांनीं ठार मारून त्याचें राज्य हिरावून घेतलें. या समयास नागादित्याला बप्प नांवाचा एक तीन वर्षांचा मुलगा होता. त्याला घेऊन त्याची आई पळत सुटली. हा बप्प उर्फ बापा रावळ फार शूर होता.

त्यानें स्वपराक्रमानें चितूराच्या राजाला वश करून घेऊन त्याच्या पश्चात् तो स्वतः त्याच्या गादीवर आला. ही गोष्ट घडल्या दिवसापासून चितूर शहर गेहलोट वंशाची राजधानी झालें.

बापा रावळनें आपला मोर्चा थेट इराणपर्यंत नेऊन भिडविला होता. त्याच्या नंतर अनेक राजे होऊन गेले. त्यांपैकीं बरेचसे कुलदीपक निपजले. त्यांच्या पैकीं थोडक्यांची माहिती समजली ह्मणजे ही गोष्ट आपणास बरोबर पटेल.

पृथ्विराज चव्हाणाच्याबरोबर राहून शहाबुद्दीन घोरी विरुद्ध पाणिपताच्या समरांगणांत आपली प्राणाहुती अर्पण करणारा राणा समरसिंह चितूराचाच राजा होता. त्याच्या मृत्यूनंतर त्याची राणी कर्मदेवी हिनें स्वतः रणांगणांत उतरून दिल्लीचा बादशहा कुतुबुद्दीन याला घायाळ करून पळायला लाविलें. अल्लाउद्दीन खुनी यानें जेव्हां चितूर शहरावर हल्ला केला तेव्हां राणा लक्ष्मणसिंह आणि त्याचा काका भीमसिंह यांनीं पुष्कळ शौर्य दाखविलें.

शिवाय भीमसिंहाची राणी पद्मिनी हिनें आपलें पातिव्रत्य सांभाळण्याकरितां जें धैर्य दाखविलें तें खरोखर आश्चर्य करण्यासारखें होतें याच सिसोदिया कुळांत हमीर, कुंभराणा, मीरांबाई इत्यादि प्रख्यात स्त्रीपुरूष होऊन गेले त्या प्रत्येकाचा इतिहास वाचण्यालायक आहे. याच चितूरच्या राणा संगाची, बाबर बरोबर झालेली लढाई याविषयीं आपण पूर्वींच वाचिलें आहे.

अकबरानें दुसऱ्या सर्व रजपूत राजांना नमविलें परंतु आतां त्याला मेवाडाच्या रजपूत राजाला नमविण्याची इच्छा झाली. हा कांहीं पोरखेळ नव्हता. मेवाडाच्या रजपुतांना आपली जात व आपला देश या विषयीं इतका अभिमान होता कीं प्राण गेला असता तरी ते कोणाच्या स्वाधीन झाले नसते.

या वेळेस राणा उदयसिंह गादीवर आला हें मेवाडाचें दुर्भाग्य होय. राणा संगाचा हा मुलगा राज्य करण्यास बिलकुल लायक नव्हता. उदयसिंह हा अगदीं लहान बालक होता त्यावेळेस त्याचा काका बनवीर यानें राज्यलोभास वश

होऊन उदयसिंहाला ठार मारून टाकण्याचा विचार केला आणि नंतर एके अंधाऱ्या रात्रीं हातांत नागवी तरवार घेऊन, ज्या ठिकाणीं उदयसिंह निजला होता त्या ठिकाणीं येऊन त्यानें दासीला विचारिलें कीं, उदयसिंह कोठें आहे ? दासीनें थरथर कांपत पाळण्याकडे आपलें बोट दाखविलें तेव्हां लागलीच वनवीरानें पाळण्यांत निजलेल्या बालकाच्या छातींत तरवार भोंसकून त्याचा प्राण घेतला.

परंतु ज्या बालकाचा निर्दय वनवीरानें खून केला तो तर पन्नादासीचा मुलगा होता. वनवीराचा खून करण्याचा बेत पन्नादासीला कळतांक्षणींच तिनें उदयसिंहाला एका करंड्यांत घालून दूर पाठवून दिलें आणि त्याच्या ठिकाणीं आपला स्वतःचा मुलगा पाळण्यांत निजविला आणि हा उदयसिंहच आहे असें तिनें वनवीराला सांगितल्या वरून त्यानें त्याचा प्राण घतला. आपल्या राज्याच्या मुलाचा जीव वांचविण्याकरितां स्वःच्या मुलाला तरवारानें ठार मारलेला पाहणें ही केवढी निस्सीम राजनिष्ठा व निमकहलाली ! पन्ना ही तर एक दासीच होती; परंतु आज इतिहासांत

आपल्या स्वामिभक्तीनें तिनें आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. अशा मोठ्या स्त्रिया आपणास पूज्यच असल्या पाहिजेत.

पण पन्नानें राखून ठेवलेल्या अशा महान् राज्योपभोगाला उदयसिंह लायक निघाला नाहीं. गादीचा तो खरा हक्कदार असल्यामुळें राज्यांतले सरदार लोक त्याला येऊन मिळाले आणि त्यांच्या मदतीनें त्याला गादीही मिळाली; परंतु तो अत्यंत आळशी, स्वच्छंदी आणि चैनी निघाला. ज्या माणसांना काम करण्याचा आळस असतो, ज्यांना ऐषआराम व मजा मारण्याचीच संवय लागते, आणि जे शरीरसुख मिळालें म्हणजे सर्व कांहीं मिळालें अशा समजुतीवर संतुष्ट होणारे असतात, त्यांच्या हातून मोठी कीर्ति वाढेल अशीं कामें कधींही होऊं शकत नाहींत. आणि कर्मधर्मसंयोगानें अशा माणसांच्या हातांत राज्यसूत्रें आलीं म्हणजे त्या राज्याचें कमनशिबच समजावें.

उदयसिंह कर्तृत्वहीन राजा असल्यामुळें मेवाड देशाची फार हीन स्थिती झाली. अकबरासारखा प्रबळ

शत्रु डोक्यावर उभा असतांही या गोष्टीकडे उदयसिंहानें दुर्लक्ष केलें आणि आपले आयुष्याचे दिवस चैनींत व ख्याली-खुशालींत घालविले. शेवट परिणाम असा झाला कीं, अकबर यानें एक मोठें सैन्य बरोबर घेऊन चितूर जिंकून घेण्याकरितां स्वारी केली. अकबरच्या स्वारीची वार्ता कानावर येतांच या भित्र्या उदयसिंहानें चितूरसारखी आपली राजधानी सोडून दिली आणि पळत सुटला. व अखेरीस अरवली पर्वताच्या पहाडांत दडून बसला.

परंतु मेवाडाची प्रजा व तेथील सरदार आपल्या राजासारखे भ्याड, धैर्यहीन व आपल्या देशाची अब्रु जाऊं देणारे नव्हते. राजा पळाला तर पळाला, परंतु त्याचे सरदार चितूरगडाचें संरक्षण करण्याकरितां आपापलें सैन्य घेऊन एकत्र झाले, आणि अकबराच्या मोठ्या सैन्याला आपल्या भाल्याचा स्वाद देण्याकरितां एका पायावर तयार झाले, मध्यंतरीं अकबरानें चालून येऊन चितूराला वेढा दिला.

सपाट मैदानाच्या मध्यभागीं सुमारें चारशें फुट उंचीच्या टेकडीवर चितूर शहर वसलें आहे. शहराच्या

सभोंवतीं असलेली भिंत आणि बुरुज यामुळें चितूरचा किल्ला, त्या वेळेस अभेद्य असा समजला जात असे. चंदावत, संगावत, झाला, तुंवार वगैरे जातींचे रजपूत लोक चितूराचें संरक्षण करण्याकरितां एकत्र झाले होते.

अकबराच्या फौजेनें शहरास बळकट वेढा दिला; परंतु फक्त वेढा देऊन स्वस्थ बसणें चालण्यासारखें नव्हतें. चितूर शहरांत अन्नपाण्याचा पुष्कळ पुरवठा भरून ठेविलेला होता. किल्यावर चढण्याचा प्रयत्न करतांच पुष्कळ मुसलमान वीर रजपूतांचे भाले व तीर यांच्या माऱ्याखालीं गडबडून पडत असत. सरतेशेवटीं अकबरानें चितूराच्या किल्ल्याच्या उंची इतकाच एक लाकडाचा किल्ला उभा केला पुष्कळ वेळ हें युद्ध चाललें; परंतु कांहीं शेवट आला नाहीं; म्हणून अकबरानें चितूरचा किल्ला सुरुंग लावून उडवून देण्याचें योजिलें. सुरुंग लावल्यामुळें किल्ल्याचा थोडा भाग तुटून पडला, आणि मुसलमान आंत घुसले. रजपूतांचा सरदार जयमल यानें सर्वांच्या पुढें उभें राहून आपल्या सैन्यास खूब चेतविलें, दोन्हीं पक्षांकडील पुष्कळ माणसें कापलीं गेलीं, आणि शेवटीं मुसलमानांना किल्ल्याच्या बाहेर पळून जावें लागलें.

रात्रीचा सुमार झाला होता, आणि अकबर स्वतः बांधलेल्या लाकडी किल्ल्याच्या टोंकावर बसून विचारांत मग्न झाला होता. त्याच्या हातांत 'संग्राम' नांवाची बंदूक भरलेली होती. चितूरगडाचा जो भाग सुरुंगानें कोसळला होता तो भाग दुरुस्त करण्याकरितां रजपुतांचा सरदार जयमल खास तेथें आला, आणि लोकांत ईर्षा उत्पन्न करून तुटलेला भाग दुरस्त करावयास लागला. दिव्याचा प्रकाश त्याच्या तोंडावर पडला असल्यामुळें अकबरानें त्यास एकदम ओळखिलें. अकबर अशी संधि फुकट जाऊं देणारा नव्हता. त्यानें अचुक नेम धरला व बंदूक सोडली. त्यासरसा जयमल ठार झाला.

जयमलासारख्या वीर पुरुषाचा त्याच्या नकळत वध झाल्यामुळें चितूरगडांत गोंधळ उडाला. रजपुतांचें सैन्य अगोदरच थोडें होतें, आणि या युद्धांत पुष्कळ जण मारले गेले. तरी पण केवळ स्वपराक्रमानें ते किल्ल्याचें संरक्षण करीत राहिले होते. अकबराचें बळ असंख्य होतें. त्याचीं सुद्धां पुष्कळ माणसें मारलीं गेलीं होतीं, परंतु

त्यांची जागा भरून काढण्यास दुसरें लष्कर तो जय्यत तयारच ठेवी. अशा स्थितींत जयमल मारला गेल्यामुळें रजपूतांनीं जिंकण्याची आशा सोडली. यश मिळो अथवा न मिळो, परंतु आपल्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत चितूर शत्रूच्या स्वाधीन करावयाचेंच नाहीं, असा सर्व रजपूतांचा निश्चय होता. त्यांनीं मरण्याची पर्वाच केली नाहीं. त्यांच्या स्त्रियांनींही त्यांना अधिक स्फुरण दिलें. प्रतापसिंह (हा राणा प्रतापसिंह नव्हे; तर दुसरा एक सरदार होता.) या नांवाचा सोळा वर्षांचा एक सरदार सर्वांचा पुढारी झाला. त्याची वृध्द माता व लहान पत्नी यांनींही चिलखतें घातलीं. हत्यारें सज्ज केलीं आणि प्रतापाबरोबर लढाईला जाण्यास तयार झाल्या. हें पाहून रजपूतांना दुप्पट शौर्य चढलें. त्यांनीं पीत वस्त्रें परिधान केलीं आणि ‘हरहर महादेव’ असा जयघोष करून मारण्यास किंवा मरण्यास सिद्ध झाले.

इकडे अकबराचें सैन्यही चितूर सर करण्याकरितां एका पायावर तयार झालें होतें. त्यांनीं या वेळेस दुसरा एक सुरुंग उडविला, तेव्हां चितूराच्या किल्ल्याचा बराच

मोठा भाग तुटून पडला. या तुटलेल्या भागांतून मुसलमान सैन्य किल्ल्यांत शिरूं लागलें. रजपूत लोक लढले आणि मरेपर्यंत एक तसूभर जमीन सुद्धां मुसलमान लोकांना घेऊं दिली नाहीं. या ठिकाणीं रक्ताचे पाट वाहले. अकबर आपल्या लाकडी किल्ल्यावर उभ्याउभ्या हा सर्व भयंकर प्रकार पहात होता. आणि रजपूतांच्या पराक्रमाविषयीं मनांत फार तारीफ करीत होता. शेवटीं पुष्कळ शौर्य दाखविलें तरी मुठभर रजपूत लोक असंख्य मुसलमानांपुढें टिकाव धरूं शकले नाहींत. प्रताप, त्याची आई आणि त्याची पत्नी हीं सर्व लढाईंत कामास आलीं, ह्मणजे मारलीं गेलीं. मुसलमानांची पुष्कळ मोठी संख्या चितूर शहरांत दाखल झाली. गल्लोगल्लीं व घरोघर युद्ध सुरूं झालें. परंतु रजपुतांच्या नशिबीं जिंकण्याचें नव्हतें. प्रत्येक रजपूतानें मरेपर्यंत लढणें थांबविलें नाहीं. मुसलमानांची विजयी सेना राजमहालसमोर येऊन पोंहोंचली, तेव्हां राजमहाल पेटलेला दृष्टीस पडाला. रजपूत स्त्रियांना मुसलमानांच्या हातांत कैदी होण्यापेक्षां अग्निमध्यें आपले देह अर्पण करणें जास्त

चांगलें वाटलें, ह्मणून राजमहालांत सर्व स्त्रिया एकत्र होऊन, अग्नि पेटवून त्यांत त्यांनीं आपल्या प्राणाहुति दिल्या.

अशा रितीनें मुसलमानांनीं जळत्या चितूराचा ताबा घेतला. हा चितूराचा वेढा आपल्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. अकबर जिंकला खरा; परंतु रजपुतांचें खरें-खुरें शौर्य त्याला या ठिकाणीं अनुभविण्याला मिळालें. महावीर जयमल आणि प्रताप यांनीं जो अद्भुत पराक्रम दाखविला त्यामुळें अकबराच्या मनांत त्यांच्याविषयीं फार आदर उत्पन्न झाला, आणि या दोन्ही पराक्रमी पुरुषांची आठवण कायम रहावी ह्मणून दोघांच्या प्रतिमा आपल्या महालाच्या दोन्ही बाजूस उभ्या केल्या. खऱ्या वीर पुरुषाला आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या कर्तबगारीची परीक्षा होत असते. आपल्या कट्टया शत्रूला सुद्धां त्याच्या उत्तम गुणांबद्दल मान देणें यांतच खरा मोठेपणा आहे.

महाराणा प्रताप याच्या नांवामध्यें कांहीं अजब जादु भरलेली आहे. पृथ्वीवर पुष्कळ पराक्रमी माणसें होऊन गेलीं आहेत; पुष्कळांनीं लढाया मारल्या आहेत व जिंकल्या

आहेत; परंतु त्यांपैकीं कित्येकांनीं तर आपल्या पराक्रमानें आपली कीर्ति अमर करून ठेविली आहे. त्यांचें स्मरण होतांच आपल्या मनांत त्यांच्याविषयीं पूज्यभाव उत्पन्न होतो आणि त्यांचें शौर्य जणूं काय आपल्यामध्यें ओतीत आहेत असें आपणास वाटूं लागतें. युरोपांत जसे सिकंदर, हानिबाल, सीझर, नेपोलियन वगैरे महापराक्रमी पुरुष होऊन गेले तसे हिंदुस्थानांतही चंद्रगुप्त, अशोक, विक्रम, पृथुराज, प्रताप, शिवाजी वगैरे महापुरूष होऊन गेले; आणि त्यांचें स्मरण होतांच आपणास मोठा अभिमान वाटतो.

प्रताप एक प्रबळ वीर होता. त्याचें शरीर फार मजबूत व कसलेलें होतें. भाला, तरवार आणि तीर मारण्यांत त्याची बरोबरी करूं शकेल असा कोणीही नव्हता. शिवाय तो एक कुशल घोडेस्वार होता. कितीही परिश्रम झाले तरी त्याला थकवा लागत नसे. त्याचें मनही त्याच्या शरीराप्रमाणेंच बळकट होतें. हातीं घेतलेलें काम पुरें केल्याशिवाय त्याला कधींही चैन पडत नसे. एकदां निश्चय केल्यावर कितीही संकटें आलीं तरी तो डगमगत नसे.

दुःखानें तो कधीं कचरत नसे. जगतांत पुष्कळ माणसें अशीं असतात, कीं सहज एखादें संकट आलें असतां निराश होऊन कपाळावर हात मारून स्वस्थ बसतात. परंतु खरे वीर पुरुष कितीही संकटें कोसळलीं तरी घाबरून न जातां धैर्यानें हातीं घेतलेल्या कामाचा पिच्छा न सोडतां रात्रंदिवस मनापासून उद्योग करीतच असतात, अशाच माणसांना आपल्या कार्यांत यश मिळतें, आणि अशींच माणसें जगतावर उपकार करूं शकतात. प्रतापसिंह गादीवर आला त्या वेळेस त्याच्यावर अनेक दुःखें आलीं होतीं. चितूरसारखें मजबूत राजधानीचें शहर त्याच्या बापानें गमाविलें होतें; मागील लढाईत मेवाडचे पुष्कळ सरदार कापले गेले होते; लष्कर कमी झालें होतें; शत्रूचें सैन्य त्याला हैराण करण्याकरितां सर्व बाजूंनीं त्रास देत होतें; मेवाडाचा पुष्कळसा भाग मोंगलांनीं आपल्या स्वाधीन करून घेतला होता; राज्याचा खजिना संपला होता; शत्रु फार प्रबळ होता; त्याच्या जवळ असंख्य फौज व खजिना तयार होता; प्रतापाच्या मदतीस येतील असे जोधपूर, जयपूर, बिकानेर वगैरे येथील रजपूत राजे तर

मुसलमानांच्या स्वाधीन होऊन प्रतापाला ते आपला शत्रु समजत असत. अशा स्थितींत प्रतापापेक्षां कमी धैर्यवान् राजा जर मेवाडाच्या गादीवर असता तर मेवाड देश मोंगलांच्या राज्याला अवश्य मिळाला असता, आणि तेथील रजपूत लोक आपली स्वतंत्रता गमवून दिल्लीच्या बादशहाची नोकरी करीत राहिले असते ! परंतु राणा प्रताप हा आपल्या नांवाप्रमाणें खरोखर प्रतापच होता. तो कधींही आपल्या शत्रूपुढें मान वांकविणारा नव्हता. त्यानें गादीवर येण्याबरोबर प्रतिज्ञा केली कीं, जोंपर्यंत गमावलेलें पिढीजाद चितूर परत मिळविलें नाहीं तोंपर्यंत राजवाड्यांत राहणार नाहीं, सोन्याचांदीच्या भांड्यांत जेवणार नाहीं आणि पथारीवर कधीं निजणार नाहीं. त्याचे आसपासचे सरदार ही प्रतिज्ञा ऐकून फार खूष झाले आणि प्रताप आपल्या कुलाचें नांव ठेवील असें त्यांना वाटलें. तेही प्रतापाच्या संकटांत वांटेकरी होण्यास तयार झाले.

यानंतर त्यानें मेवाडाच्या सर्व प्रजेला हुकुम फर्मावला कीं, कोणीही शहरांत किंवा खेडगांवांत राहूं नये, पहाडांत किंवा

जंगलांत चालतें व्हावें. हा हुकुम करण्यांत त्याचा एक हेतु होता. मुसलमानी सैन्य तर मेवाड देशावर चरून राहिलें होतें. त्यांना आसपासच्या वस्तीच्या प्रदेशांतून दाणा वैरण मिळत असे त्यामुळें त्यांचें सैन्य नेहमीं ताजेतवानें राही. वस्तीवाले देश जर ओसाड पडले तर मुसलमानी सैन्यास दाणागोट्याशिवाय उपासमार काढावी लागेल, ही प्रतापाची युक्ति कसेंही करून मुसलमानांना त्रास देऊन देशातून हांकून देण्याची होती. या हुकुमाची अम्मलबजा- वणी त्यानें फार कडक रीतीनें केली. कोणीही मनुष्य जर वस्तीचा प्रदेश सोडून गेला नाहीं तर त्याला मोठी शिक्षा होत होती.

दिल्लीहून गुजराथेंत जाण्यास मेवाडाचा रस्ता फार सोपा व सुखकर होता. फौज, व्यापारी, वणझारे वगैरे मेवाड देशांतूनच गुजराथेंत उतरत असत. प्रताप पहाडांत राहून वेळ साधून मुसलमानांवर तुटून पडत असे आणि त्यांची धनदौलत लुटून त्यांना त्राहि भगवान् करून सोडी प्रतापाचें नांव ऐकतांच आतां मुसलमान लोक थरथर कांपत

असत. अकबरानें प्रतापाला पकडण्याकरितां एकामागून एक सरदार लष्कर देऊन पाठविले; परंतु सर्व प्रयत्न निष्फळ झाले. प्रतापाच्या शौर्यापुढें त्याला पकडण्याचे सर्व प्रयत्न फुकट जात, आणि तो मुसलमानांच्या सैन्याच्या हातावर तुरी देऊन पर्वतांमध्यें कोठेंनाकोठें तरी लपून जाई.

याप्रमाणें प्रतापाचे दिवस जात होते. तो राजा होता पण त्याला राज्यसुख मिळत नव्हतें. पुष्कळ राजे राज्यपद प्राप्त झालें ह्मणजे गाडीघोड्यांतून फिरण्यांत, नाचरंग, तमाशे व ऐषआराम यांत आपल्या आयुष्याचे दिवस घालवितात! परंतु प्रतापाला या गोष्टीची मुळींच पर्वा नव्हती, त्याला तर आपल्या देशाला मुसलमानांच्या भयापासून मुक्त करावयाचें होतें, आणि गमाविलेला आपला देश दिल्ली परत मिळवावयाचा होता. पण ही गोष्ट ह्मणजे कांहीं पोरखेळ नव्हता. अकबरासारखा चतुर शत्रु त्याला नमविण्याकरितां प्रयत्न करून राहिला होता. अकबराचें सैन्य असंख्य होतें; मोटमोठीं रजपूत राज्यें त्याच्या बाजूचीं होतीं; मेवाडाच्या चारी बाजूकडील प्रदेशांवर त्याची सत्ता गाजत होती; प्रता-

पाला मात्र एकट्याला लढावयाचें होतें. त्याचें धैर्य अचल होतें, आणि त्याचें लहान लष्कर पण त्याची सेवा करण्यांत प्राणाची पर्वा करणारें नव्हतें. ज्या ज्या रजपूत राजांनीं अकबराशीं शरीरसंबंध जोडला होता व त्याची सेवा पत्करिली होती, त्या त्या सर्वांविषयीं प्रताप फार तिटकारा दाखवीत असे. स्वधर्म व स्वकूल यांविषयीं अभिमान हें मेवाडाच्या रजपूतांचें खरें ब्रीद होतें. यामुळें विधर्मी मुसल्मानांच्या स्वाधीन होऊन त्यांना आपल्या मुली देणारे जोधपूर आणि जयपूर वगैरे देशांतील राजे यांविषयीं प्रताप धिक्कार प्रगट करीत असे यांत आश्चर्य तें कोणतें ! जोधपूर आणि जयपूर येथील राजे ही गोष्ट पूर्णपणें जाणून होते, आणि द्वेषानें मनांत जळफळत असत. आपल्याप्रमाणेंच प्रतापानेंही अकबराच्या स्वाधीन होऊन आपली कन्या त्याला द्यावी, अशी त्यांची फार इच्छा होती. परंतु प्रतापाची प्रतिज्ञाच होती कीं, प्राण गेला तरी शत्रूला नमावयाचें नाहीं आणि मुसलमानाला कन्या देऊन शुद्ध सिसोदिया कुळाला कलंक लावावयाचा नाहीं. ही प्रतिज्ञा मोडा-

याला लावण्यास त्यांनीं आटोकाट प्रयत्न केले; परंतु त्यांत त्यांना मुळींच यश आलें नाहीं.

प्रतापाला प्रतिज्ञा मोडायला लावण्यामध्यें जयपुरचा राजा मानसिंह मुख्य होता. राजा भगवानदासाच्या मृत्युनंतर त्याच्या गादीवर येणारा हा मानसिंह फार शहाणा, बुद्धिवान् आणि पराक्रमी पुरुष होता. त्याच्या युद्धकुशलतेमुळें अकबराला पुष्कळ विजय प्राप्त झाले होते. काबूल सर करण्याकरितां पाठविलेल्या सैन्याचा तो सेनापति होता. काबूल हें हिंदुस्थानाच्या सरहद्दीवर असलेल्या अफगाणिस्थान देशाचें मुख्य शहर आहे. तेथें जाण्यास अटक नदी ओलांडावी लागत असे. त्या वेळेस हिंदु लोकांमध्यें असा एक समज होता कीं, अटक हें एक हिंदुस्थानाचें टोंक असल्यामुळें त्याच्या पलीकडे जो कोणी हिंदु जाईल तो बाटेल. अकबराचें सैन्य घेऊन राजा मानसिंह अटक ओलांडून गेला तेव्हां त्याला विचारिलें कीं, 'तुम्ही हिंदु आहां तेव्हां अटकेच्या पलीकडे बाटल्याशिवाय कसे जाऊं शकाल?' असें म्हणतात कीं, त्या वेळेस त्यानें फार खुबीदार जबाब

खाली दिलेल्या दोहऱ्यांत किंवा त्या दोहऱ्याच्या भावार्थांत दिला:—

"सबही भूमी गोपालकी वा मैं अटक कहां?
जिसके मनमें खटक हैं वोही अटक रहा!"

गुजराथेंतील एक लढाई आटोपून राजा मानसिंह दिल्लीकडे जात होता. जातां जातां त्यानें महाराणा प्रताप याला निरोप पाठविला कीं, मी थोडा वेळ आपल्या येथें पाहुणा या नात्यानें राहीन. हिंदुलोक पाहुण्याचें आदरातिथ्य करण्यांत फारच प्रख्यात होते. अतिथीला देवाप्रमाणें मानावें अशी त्यांना धर्माची आज्ञा आहे आणि अजूनसुद्धां अभ्यागतांचा आदरसत्कार करण्यांत जरासुद्धां संकोच करीत नाहींत. वाटेल तसा कट्टा शत्रु असला तरी अतिथी ह्मणून आला तर त्यावेळपुरता सर्व शत्रुभाव विसरून जाऊन त्याचें आगतस्वागत करणें यांत हिंदुलोक आपला मोठेपणा समजतात. मानसिंह अकबराच्या पक्षाचा होता ह्मणून तो प्रतापाचा कट्टा शत्रुच होता; परंतु वरीलप्रमाणें मानसिंहानें पाहुणचाराची मागणी केली ती प्रताप मान्य कर-

णार नाहीं असें होणें तर शक्यच नव्हतें. त्यानें पुष्कळ संतोष दाखविला आणि पुष्कळ आग्रहपूर्वक आणि मानपूर्वक मानसिंहाला बोलाविलें. त्याच्या स्वागताप्रीत्यर्थ एखाद्या राजाला शोभेल अशी व्यवस्था केली. एका सुंदर सरोवराच्या कांठीं भोजनावगैरेची तयारी ठेविली. राजा मानसिंह त्या ठिकाणीं भोजनास आला, आणि मोठमोठे सरदार लोक व राजकुटुंबांतील मंडळी बसलेली त्यानें पाहिली; परंतु राणा प्रताप त्याच्या नजरेस कोठें दिसला नाहीं. मानसिंहाला हें बरोबर वाटलें नाहीं. त्यानें विचारलें " माझ्याबरोबर भोजनास आज राणाजी कां नाहींत ? " प्रतापाला हें माहीतच होतें कीं, मानसिंह आपण भोजनास नाहीं म्हणून त्याविषयीं प्रश्न विचारील. म्हणून त्यानें आपला मुलगा अमरसिंह याला सांगून ठेविल्याप्रमाणें अमरसिंहानें जबाब दिला:—"राणाजींचें डोकें फार दुखत आहे, म्हणून आपल्या पंक्तीचा ते लाभ घेऊं शकणार नाहींत; परंतु आम्ही सर्व आपल्या स्वागतार्थ हजर आहों." मानसिंह प्रतापाला पूर्ण ओळखून होता.

त्याला वाटलें कीं, डोकें दुखणें ही कांहींतरी सबब आहे. परंतु खरें कारण मात्र इतकेंच आहे कीं, आपण अकबरासारख्या मुसलमानाशीं शरीरसंबंध जोडल्यामुळें महाकुलाभिमानी प्रताप आपल्याबरोबर भोजन करण्यांत काळिमा येईल असें समजतो. त्यानें निश्चय केला कीं, जोंपर्यंत राणा आपल्याबरोबर भोजनास बसणार नाहीं तोंपर्यंत आपण अन्न ग्रहण करणार नाहीं. वाढलेल्या पानावरून मानसिंहासारख्या पाहुण्यानें जेवल्याशिवाय उठून जावें हें कोणासही बरें वाटलें नाहीं. सर्वांनीं त्याला पुष्कळ सांगून पाहिलें, परंतु त्यानें आपला निश्चय सोडला नाहीं. त्यानें प्रतापाला सांगून पाठविलें कीं, होणार तें होऊन गेलें, गत गोष्ट विसरून जाऊन माझ्या पंक्तीस चलावें. परंतु प्रतापसिंहाचा अभिमान अढळ होता. स्वकुलाचा महिमा आणि पवित्रता यांविषयीं त्याची इतकी उच्च भावना होती कीं, तो मानसिंहाच्या आग्रहाला बळी पडला नाहीं. शेवटीं मानसिंह वगैरे मंडळी जेथें बसली होती त्या ठिकाणीं येऊन तो ह्मणाला कीं, " मला फार वाईट वाटतें, परंतु जे रजपूत

आपल्या कन्या व बहिणी यांचें मुसलमानांशीं लग्न करतात त्यांच्या पंक्तीला मी कधींही जेवणार नाहीं."

प्रतापाचें असें अपमानकारक उत्तर ऐकून राजा मानसिंहाच्या तळव्याची आग मस्तकास गेली. अन्नाचा अपमान होऊं नये म्हणून एकच आहुती घेऊन तो पानावरून उठला. प्रतापाकडे वळून तो म्हणाला कीं, "राण्या, मुसलमानांना आम्ही आपल्या मुलीबाळी दिल्या तें आमच्या अब्रूचें रक्षण करितां, परंतु पहातों आतां तुम्ही आपल्या अब्रूचें कसें रक्षण करतां तें!" असें म्हणून तो आपल्या घोड्यावर स्वार झाला, आणि क्रोधयुक्त दृष्टीनें प्रतापाकडे पाहून तो चालायला लागला, तेव्हां प्रतापानें म्हटलें कीं, 'तर मग आतां आपण रणमैदानांत लवकरच भेटूं!' 'ठीक आहे' असें म्हणून मानसिंहानें आपल्या घोड्यास टांच मारली.

बादशाहा अकबराला ही गोष्ट समजली. राजा मानसिंह त्याचा नातेवाईक होता, मित्र होता, आणि त्याच्या गुणांमुळें अकबर त्याच्यावर फारच ममता करीत असे.

त्याचा असा अपमान झालेला अकबराला सहन झालें नाहीं. त्याला फार राग आला, आणि त्या आवेशांत त्यानें तावडतोब एक मोठें सैन्य तयार केलें आणि तें आपला पुत्र सलीम आणि राजा मानसिंह यांच्या अमलाखालीं प्रतापा विरुद्ध पाठविलें; तें थोड्याच वेळांत मेवाड देशावर येऊन दाखल झालें.

प्रतापानें ताडलेंच होतें कीं या प्रकारामुळें अकबराचा आपल्याविषयीं द्वेष जास्तच वाढेल. मानसिंहाचा अपमान तोच अकबराचा अपमान होता, ह्मणून त्याबद्दल सूड घेण्यास अकबर आपल्या सर्व सामर्थ्याचा उपयोग करील हें जाणून अकबराच्या सैन्याची तो दरेक क्षणीं वाट पहात राहिला होता. त्याचाशीं सामना करण्याकरितां रजपूत आणि भिल्ल यांचें २२००० सैन्य गोळा केलें होतें, आणि अरवली पर्वतामध्यें स्वतःचा मुक्काम ठेविला होता.

अकबराचें सैन्य समुद्राच्या लाटेप्रमाणें पुढें चाल करून येत होतें. त्यांची संख्या आणि साधनसामुग्रीपुढें प्रतापाचें सैन्य कःपदार्थ होतें. अरवली पर्वतांतून एक लांब-

लचक मार्ग मेवाडाच्या प्रदेशांत जातो त्या मार्गाला हळदीघाट असें म्हणतात. त्याच्या दोन्हीं बाजूला मोठमोठीं शिखरें झालेलीं आहेत, आणि त्या शिखरावर दाट जंगल उगलेलें आहे. मोंगलांचें सैन्य अटकविण्याकरितां आपलें बावीस हजार सैन्य बरोबर घेऊन प्रताप हळदीघाटाच्या नाक्यावर उभा राहिला. त्याचें हृदय आनंद व उत्साह यानें भरून गेलें. अनेक हत्यारांनीं सज्ज होऊन, आपला सुंदर आणि आवडता घोडा ' चेतक ' यावर स्वार होऊन महापराक्रमी प्रताप हंसतमुख आपल्या सैन्यासमोर उभा राहिला तेव्हां त्याच्या सैन्यास आनंद झाला. युद्धाचा दिवस तो रज-पूतांना उत्सावाचा दिवस वाटतो. त्यांतल्यात्यांत स्वतःपेक्षां प्रबल शत्रूशीं युद्ध करण्याचा प्रसंग आला म्हणजे तर त्यांना परमानंद होतो. दुर्बळांशीं लढणें त्यांना मुळींच पसंत नाहीं.

समोरून मोंगल सैन्य येऊन धडकलें. मोंगल सैन्याला तर असेंच वाटत होतें कीं, एका निमिषांत प्रता-पाच्या सैन्याला मशकटाप्रमाणें चिरडून टाकूं. पण हा त्यांचा समज चुकीचा होता. रजपूतांनीं मोंगल सैन्याला पाहतांच

' हरहर महादेव ' अशी गर्जना केली आणि पुढें सरले. लगेच युद्धाला सुरुवात झाली. दोन्ही पक्षांकडून सूंसूं करीत बाण सुटूं लागले. विजेप्रमाणें तरवारी चमकायला लागल्या; एकमेकांसमोर भाले सुटूं लागले. मधूनमधून बंदुकांचे अवाजही येऊं लागले; घोडे खिंकाळण्यास सुरुवात झाली; वीरश्री उत्पन्न करणाऱ्या नौबती व शिंगें वाजूं लागलीं; भाट वीररसप्रधान कविता गाऊं लागले; ' मारो मारो, ' ' अल्लाहो अकबर, ' आणि ' हरहर महादेव ' वगैरे अनेक स्वरमिश्रित गर्जनांनीं समरभूमि दुमदुमून राहिली; मुसलमानांचा आपल्या संख्येवर विश्वास होता; परंतु रजपूतांच्या भाल्यांनीं त्यांचीं माणसें पटापट मरूं लागलीं. प्रतापाच्या तरवारीनें तर सर्वांच्या अंतःकरणांत धडकी उत्पन्न केली. ' चेतक ' घोड्यावर विराजमान झालेला महापराक्रमी प्रताप मोंगल सैन्यांत घुसला. त्याच्या मार्गांत येणाऱ्या सर्व मोंगल सैनिकांवर त्याची तरवार गाजूं लागली. वीरश्रीस चढलेला प्रताप मागेंपुढें न पाहतां आपली तरवार परजीत पुढच्यापुढें घुसतच चालला. प्रचंड नाद करून तो

राजा मानसिंह यास शोभित होता; आणि समोरासमोर युद्ध करण्याकरितां वारंवार त्याचें नांव घेऊन त्यांलों बोलवीत होता. त्याचा पराक्रम पाहून सर्व स्तब्धच झाले. शत्रूला तो काळाप्रमाणें वाटूं लागला. स्वतःच्या महाराण्याला सिंहाप्रमाणें रणांगणांत वावरतांना पाहून मेवाडाच्या रजपूतांनां फार आनंद झाला. प्रतापाची पाठ राखून त्यांनीं सुद्धां मरण्याची पर्वा केली नाहीं. मोंगल सैन्याचा पहिला भाग दुभागला गेल्यामुळें प्रताप सैन्याच्या मध्यभागीं घुसला. प्रतापाला एकटाच पाहून शत्रूच्या टोळीच्या टोळी त्याच्यावर तुटून पडल्या, परंतु त्या सर्व अडचणींतून त्यानें आपला मार्ग काढला आणि राजपुत्र सलीमाचा हत्ती जेथें उभा होता तेथें जाऊन पोहोंचला. सलीमाचे अंगरक्षक सावध होण्यापूर्वींच प्रतापानें आपल्या घोड्याला टांच मारली. चेतकही आपल्या धन्याचा हेतु समजला, आणि विजेप्रमाणें एकदम कुदून लोखंडासारखे आपले पाय हत्तीच्या गंडस्थळावर रोंविले. लागलीच आपला प्रचंड भाला राण्यानें सलीमावर मारला. सलीमाला हा खरा आणीबाणीचा

प्रसंग होता, पण त्याचें भाग्य मोठें असल्यामुळें प्रतापाचा भाला हौद्यावर मढविलेल्या लोखंडाच्या पत्र्यावर आपटला, आणि मृत्यूच्या पंजांत सांपडत असतां राजपुत्र सलीम वांचला. भाल्याच्या आघातानें हौदा हादरला आणि तोच भाला उलटून महाताला लागला आणि लागलाच त्याचा प्राण गेला. प्रतापानें आपल्या वज्रासारख्या हातांतून ज्यावेळेस भाला सोडला, त्यावेळेस या आघातापासून सलीम वांचेल असें कोणास वाटलें नाहीं. परंतु ईश्वरी योजना फार अगाध आहे. सलीम या प्रहरांतून वांचला व पुढें अकबराच्या मृत्यूनंतर जहांगीर या नांवानें दिल्लीच्या गादीवर बसला आणि प्रख्यात नूरजहानशीं लग्न करून पुष्कळ दिवस त्यानें सुखोपभोगांत घालविले.

महात खालीं पडल्यावर हत्ती घाबरून जाऊन चोहों-कडे पळत सुटला. त्याच्या मागोमाग प्रतापानें आपला घोडा फेंकला, राजपुत्र सलीमाच्या पाठीमागें जणूं काय मृत्यु घिरट्या घालीत आहे असे सर्वांना वाटलें. प्रतापाला अड-थळा करण्याकरितां पुष्कळ मुसलमान वीरांनीं आपले प्राण

खर्ची घातले. सलीमाला मारण्याच्या धुंदीत प्रताप इतका पुढें चालू करून गेला कीं, त्याचा आणि त्याच्या सैन्याचा संबंध मुळींच राहिला नाहीं. त्याला चारी बाजूंनीं मुसलमानी सैन्य घेरीत होतें; त्याला आणि त्याच्या घोड्याला पुष्कळ जखमा झाल्या होत्या; परंतु कांहीं झालें तरी प्रताप आपला धीर सोडणारा नव्हता; सलीम तर या मुदतींत आपल्या सैन्याच्या पाठीमागें सुरक्षितपणें घुसून गेला होता. प्रतापाला शत्रुसैन्यांत एकटाच घुसलेला पाहून त्याचे सरदार चिंतातूर झाले आणि त्याचें रक्षण करण्याकरितां तेही मुसलमानी सैन्यांत घुसले. झालाराणा मानसिंह सर्वांच्या पुढें चालून आला, आणि हजारों शत्रुसैनिकांमध्यें निर्भीडपणें घुसणाऱ्या प्रतापाला पाहून त्याला भीति वाटली कीं, अशा स्थितींत प्रतापाचा जीव फार धोक्यांत आहे. रजपूत लोक आपल्या राजाकरितां प्राण देण्यास मुळींसुद्धां कचरत नसत. झालाराण्याला वाटलें कीं प्रतापासारखा पराक्रमी पुरुष जर जिवंत राहिला तर पुनः युद्ध करून विजय मिळवील. प्रतापसिंहालाही वाटलें कीं, आपण शत्रूंनीं घेरले गेलों

आहों, आणि त्यांतून सुटण्यास दुसरा मार्ग नाहीं. इतक्यांत 'जय,' राणा प्रतापकी जय, असा ध्वनि आपल्यामागून येतांना ऐकिला, आणि मागें वळून पाहिलें तो स्वतःचा शूर सरदार झाला राणा येतांना दिसला. झाला राण्यानें प्रतापाला परत फिरण्यास सांगितलें, परंतु प्रतापाला ही गोष्ट रुचणार कशी ! त्याच्या मस्तकावर छत्रचामरें धरलीं असल्यामुळें तो एकदम ओळखला जात होता आणि शत्रूला त्याच्यावर वारंवार हल्ले करणें सोपें जात होतें. प्रताप मागें हटणार नाहीं असें पाहून त्याच्या डोक्यावर असलेलीं छत्रचामरें झाला राण्यानें आपल्या डोक्यावर ओढून घेतली आणि खूब जोरानें तो पुढें सरकला. त्यांच्या डोक्यांवर राजचिन्हें पाहून, हाच प्रताप आहे असें समजून, सर्व मुसलमान त्याच्याकडेच वळले. त्याच्या आजुबाजूस भयंकर युद्ध जुंपलें. अनेक रजपूत व मुसलमान कापले गेले. रक्ताच्या नद्या वाहल्या. परंतु मोंगल सैन्य अगणित असल्यामुळें रजपूतांचें कांहीं चालेना. एकामागून एक त्यांचे सरदार कापले गेले. आपल्या धन्याचा प्राण वांचवून झाला राण्यानें स्वतःचा प्राण दिला. ग्वाल्हेरचा पदच्युत झालेला राजा

रामसिंह, ज्याला प्रतापानें आश्रय दिला होता, तो आपल्या पुत्रासह मारला गेला. प्रतापाचे पुष्कळ नातेवाईक या युद्धांत पडले. आणि अलौकिक शौर्य दाखविलें तरी अल्प संख्येमुळें रजपूतांना माघार घ्यावी लागली.

या युद्धांत झाला राण्यानें जी स्वामिनिष्ठा दाखविली त्यामुळें त्याचें नांव मेवाडाच्या इतिहासांत अमर होऊन गेलें आहे. राजाला ऐन युद्धांतून वांचवून सर्व जोखीम स्वतः शिरावर घेऊन प्राणाची परवा न करणें ही कांहीं लहानसहान गोष्ट नव्हे. खरी निमकहलाली तर यांचेंच नांव. अशी अपूर्व स्वामिभक्ति दाखविल्याबद्दल झाला राण्याच्या वंशजांनां राजचिन्हें धारण करून मेवाडाच्या राण्याच्या उजव्या हाताला बसण्याचा अधिकार देण्यांत आला आहे.

हळदीघांटचा हा महासंग्राम पुरा झाल्यावर महाराणा प्रताप आपल्या 'चेतक' अश्वावर स्वार होऊन निघाला. त्याचें शरीर रक्तबंबाळ झालें होतें. मोठें शौर्य गाजविलें तरी जय झाला नाहीं ह्मणून त्याचें मन अत्यंत दुःखित झालें. अनेक शत्रूंनां त्यानें लोळविलें होतें, तथापि

सलीम आणि राजा मानसिंह त्याच्या हातातून निसटले हें त्याच्या मनांत सलायला लागलें. घायाळ शरीर आणि दुःखी मन बरोबर घेऊन त्यानें पर्वताचा मार्ग धरला. त्याचा घोडा 'चेतक' ही रक्तानें माखला होता आणि पुष्कळ थकला होता तरी धन्याला पाठीवर घेऊन आपला मार्ग काढीत होता.

प्रतापसिंहानें मागें वळून पाहिलें तेव्हां दोन मोंगल घोडेस्वार आपला पाठलाग करीत येतांना त्याला दिसले. इतक्यांत रस्त्यांत एक वहात्या पाण्याचा ओढा लागला. 'चेतक' थकला होता तरी टांच मारतांच तो झरा ओलां-डून गेला. मोंगलांचे घोडे झरा ओलांडूं शकले नाहींत म्हणून मागें राहिले. आतां चेतकाच्या अंगांत मुळींच त्राण राहिला नव्हता. ओढा ओलांडून त्यानें आपल्या धन्याची शेवट-चीच कामगिरी बजाविली होती. पुढें जाणें त्याला शक्य नव्हते. मोंगल स्वारांनीं आपले घोडे पाण्यांतून आणिले आणि थेट प्रतापसिंहाजवळ येऊन भिडले. तितक्यांत राण्यानें बंदूकीचा बार ऐकला. मागें वळून पाहिलें तों पहिले

दोन घोडेस्वार दिसले नाहींत पण त्यांच्या ठिकाणीं दुसरा एक घोडेस्वार दुरून " हो! अस्मानी घोड्यावर विराजमान झालेल्या स्वारा! उभा रहा, उभा रहा " असें ओरडतांना ऐकिलें. प्रतापसिंहानें टक लावून पाहिलें, आणि त्याच्या हृदयांत क्रोधाग्नि भडकला:—' कोण? माझा हाडवैरी बंधु शक्तिसिंह! माझ्या या स्थितीचा फायदा घेऊन माझ्या-वर चालून येत आहे!" असे शब्द उच्चारतांच प्रतापाच्या डोळ्यांतून क्रोधाच्या ठिणग्या बाहेर पडूं लागल्या.

शक्तिसिंह हा प्रतापाचा भाऊ होता. दोघे बंधू एके वेळीं शिकार करण्याकरितां गेले होते. आनंदानें शिकार करीत असतां दोघांचे तीर एकाच वेळेला एका अस्वलास लागले. कोणाच्या बाणानें त्याचे प्राण गेले याविषयीं पर-स्परांत वाद सुरू झाला. हलुहळू शब्दावरून ते हातघाईस आले, आणि हत्यारें उपसून द्वंद्व युद्ध सुरू झालें. दोघांचेही जीव धोक्यांत आलेले राज-पुरोहितानें दुरून पाहिलें. विनाकारण हे दोघे वीर युद्ध करून कापले गेले तर मेवा-डाच्या गादीसंबंधानें फिरून तंटे माजतील अशी काळजी

त्या राजगुरूला पडली. त्यानें दोघांनाहि पुष्कळ समजूतीच्या गोष्टी सांगितल्या; परंतु एकेरीवर आलेल्या दोघांपैकीं एकानेंही तिकडे लक्ष दिलें नाहीं. हें युद्ध थांबविण्याचा एकच उपाय आहे असें पुरोहितास वाटलें. आणि मेवाडावर गुदरणारी भयंकर आपत्ति टाळण्याकरितां दोघेजण एकमेकांवर क्रूरपणानें हत्यार चालवीत असतां तो त्यांच्यामध्यें एकदम कुदून पडला, आणि लगेच दोघांच्या हातून कापला गेला. पुरोहिताचा आपल्या हातून असा अकस्मात मृत्यु झालेला पाहून दोघेजण स्तब्ध राहिले. त्यांना वाटलें कीं या निरपराधी ब्राह्मणानें द्वंद्वयुद्ध थांबवावें ह्मणूनच आपला प्राण खर्चीं घातला.

हिंदु लोकांमध्यें ब्राह्मणांना पुष्कळ पवित्र आणि पूज्य मानितात त्यांच्यावर हातसुद्धां उगारण्याची मनाई आहे. अशा एका पवित्र ब्राह्मणाचा आपल्या वेडेपणामुळें मृत्यु झालेला पाहून त्यांच्या अंतःकरणांत शोक आणि पश्चाताप उत्पन्न झाला. दोघांनींही युद्ध थांबविलें. परंतु प्रतापाच्या हृदयांतील क्रोधाग्नि अद्याप शांत झाला नव्हता. त्यानें

आपला भाऊ शक्तिसिंह याला आज्ञा केली कीं 'तूं माझ्या देशांत पाय ठेऊं नकोस!' या अपमानानें क्रुद्ध होऊन शक्तिसिंह घोड्यावर स्वार होऊन एकदम तेथून चालता झाला.

मेवाड देशांतून बाहेर पडल्यावर कोठें जावें याचा त्यानें विचार केला. रजपूत लोक केवळ आपल्या शौर्यावरच उपजीविका करितात. राजस्थानांतील दुसरीं रजपूत राज्यें दिल्लीच्या बादशहाचें आधिपत्य मान्य करीत होतीं. शक्तिसिंहाला राहण्यालायक दोन स्थळें होतीं. एक मेवाड व दुसरें दिल्ली. मेवाडांतून त्याला हद्दपार केलें होतें म्हणून दिल्लीला जाऊन राहणें त्याला बरें वाटलें. शिवाय अकबर रजपूतांनां पुष्कळ मान देत असे, आणि त्यांची प्रीति संपादण्यास पुष्कळ प्रयत्न करीत असे. शक्तिसिंहानें नाइलाजास्तव अकबराच्या पदरीं नोकरी पतकरिली.

महाराणा प्रतापाविरुद्ध पाठविलेल्या सैन्या बरोबर शक्तीसिंहाला यावें लागलें होतें. हळदीघाटच्या भयंकर लढाईत त्यानें आपल्या भावाचा पराक्रम पाहिला होता.

आणि त्याच्या हृदयांत बंधुप्रेमभाव उत्पन्न झाला होता. आपल्यांत म्हण आहे कीं, 'काठी मारून पाणी दुभंगत नाहीं.' बंधुबंधूंतील प्रकार असाच आहे. क्वचित त्यांच्यांत बेबनाव झालेला दिसेल; पण प्रसंग येतांच प्रेम जागृत होतें. सिंहाप्रमाणे गर्जना करणाऱ्या आपल्या भावाला पाहून शक्तीसिंहाचें हृदय अभिमानानें भरून आलें. आपला भाऊ असा शूर आहे असें पाहून त्यानें परमेश्वराचे आभार मानिले. त्याची नजर प्रतापाकडे होती. समरांगणांतून परत फिरतांना त्यानें प्रतापाला पाहिलें आणि त्याचा पाठलाग करणाऱ्या दोन मोंगल घोडेस्वारांनांही पाहिलें. घायाळ झालेला आणि थकलेला प्रताप या घोडेस्वारांकडून कदाचित् मारला जाईल या भीतीनें शक्तिसिंहानें आपला घोडा त्यांच्या नकळत त्यांच्या मागोमाग दवडविला. ओढा कुदून गेल्यावर चेतकाला पुढें जाण्याची शक्ति नव्हती, हें लक्षांत येऊन पहिले घोडेस्वार प्रतापाचा घात करणार तोंच शक्तिसिंहानें मागून गोळ्या झाडून त्यांना ठार केलें आणि प्रतापाला ओरडून म्हणाला कीं " हो ! अस्मानी घोड्यावर विराजमान झालेल्या स्वारा ! उभा रहा, उभा रहा. "

प्रतापाला तर असेंच वाटलें कीं, शक्तिसिंह आपला प्राण घेण्याकरितां येत आहे. थकला होता तरी आपली तरवार उपसून घोड्यावरून खालीं उतरला, आणि दांतओंठ खावून मोठ्या आवेशानें शक्तिसिंहावर चालून येण्याच्या तयारींत होता. परंतु शक्तिसिंह जवळ आला. घोड्यावरून उतरला आणि आपलीं हत्यारें फेंकून दिलीं. नंतर अश्रुपूर्ण नयनांनीं आपलें मस्तक प्रतापाच्या चरणावर ठेविलें. प्रतापाचे चरण अश्रूंनीं भिजले आणि वैरभाव विसरून आपल्या चरणावर लोटांगण घालणाऱ्या भावाकडे न्याहाळून पहातांच प्रतापाचे डोळेही अश्रूंनीं भरून आले. शक्तिसिंहाला उठवून अत्यंत प्रेमानें त्याला आलिंगन दिलें, आणि पूर्वींचें वैर विसरून जाऊन दोघेही पूर्ववत् बंधु झाले.

एकीकडे दोघा बंधूंचा विलाप हा शुभकारक प्रसंग होता तर दुसरीकडे प्रताप आणि त्याचा प्रिय अश्व 'चेतक' यांचा वियोग हा दुःखकारक प्रसंग ओढवला होता. हा चेतक अत्यंत पाणीदार, चलाख, समजुतदार आणि धन्याची इच्छा तेव्हांच ओळखणारा असा घोडा होता. अनेक युद्ध-

प्रसंगीं तो प्रतापाचा साथीदार होता आणि सदासर्वदा प्रतापाचें रक्षण होईल अशाच रीतीनें तो वर्तत असे. हळदी-घांटाच्या युद्धांत त्याला जेथें फेंकला होता तेथें तो यशस्वीच झाला होता. सलीमाच्या हत्तीच्या गंडस्थळावर आपला पाय ठेवून भाला मारण्यांत जितकी प्रतापाची कुशलता होती तितकीच कुशलता ह्या घोड्याचीही होती. मेवाडांत घरोघर या प्रसंगाचें चित्र पाहण्यांत येतें. हळदीघांटाच्या लढाईत त्याला अनेक जखमा होऊन रक्तबंबाळ झाला होता तरी प्रतापाला या ठिकाणीं ओढा कुदून सुरक्षित घेऊन आला होता. आतां तो फार वेळ जिवंत राहण्याची आशा नव्हती. शक्तिसिंह येतांच प्रताप घोड्यावरून उतरला होता, आणि दोघा बंधूंच्या समोर प्रतापाच्या या अत्यंत लाडक्या घोड्यानें आपले प्राण सोडले.

प्रतापाच्या शोकास पारावार नव्हता. चेतकाची योग्यता त्याला पूर्ण माहीत होती, म्हणून त्याच्या मृत्यूबद्दल तो अतिशय शोक करूं लागला. जोंपर्यंत इतिहासांत प्रतापाचें नांव गाजत राहील तोंपर्यंत चेतकाचेंही राहील.

इतिहासांत कित्येक शूर राजे आणि योद्धे यांच्याबरोबर त्यांच्या घोडयांचीही कीर्ति अमर राहिली आहे. अश्या प्रख्यात घोड्यांमध्यें चेतकाचें नांव अग्रभागींच राहणार. प्रतापानें त्याचें स्मारक म्हणून त्याच्या मृत्यूच्या जागीं एक चबुतरा बांधला, आणि तो हल्लीं ' चेतकाचा चबुतरा ' या नांवानें प्रसिद्ध आहे.

आपण बराच वेळ जर प्रतापाबरोबर राहिलों तर सलीमाला शंका येईल आणि प्रतापावर भयंकर प्रसंग गुदरेल या भीतीनें शक्तिसिंहानें आपला घोडा प्रतापाला दिला, आणि सांगितलें कीं, वेळ पडल्यास पुनः मी आपल्या सेवेंत हजर होईन. असें म्हणून त्यानें प्रतापाची रजा घेतली, आणि स्वतः त्या मारलेल्या मोंगलांच्या दोन घोड्यांपैकीं एकावर स्वार होऊन सलीमाजवळ येऊन पोहोंचला.

शक्तिसिंहाच्या चेहेऱ्यांत झालेला फरक सलीमानें पाहिला, आणि दुसऱ्याच्या घोड्यावर बसून आलेला त्याला पाहून त्याचें मन अधिक साशंक झालें. त्यानें विचारिलें कीं ' प्रतापाचा पाठलाग करणारे दोन घोडेस्वार कोठें

आहेत, आणि तुम्हांला त्यांच्या घोड्यावर बसून कां यावें लागलें ? ' शक्तिसिंहानें उत्तर दिलें कीं, त्या दोन घोडेस्वारांना प्रतापानें कापून टाकिलें आणि युद्धांत माझा घोडाही मारला गेला, म्हणून मला त्यांच्या एका घोड्यावरून यावें लागलें. सलीमाला ही गोष्ट खरी वाटली नाहीं, म्हणून त्यानें शक्तिसिंहाला अभयवचन दिलें कीं, ' जर तूं खरी हकीकत सांगशील तर तुझा अपराध माफ होईल. '

शक्तिसिंहाचा चेहरा गंभीर झाला. आवेशयुक्त स्वरानें तो म्हणाला:—' ज्याच्या डोक्यावर सर्व मेवाडाचा राज्यभार आहे, आणि ज्याच्या जीवितावर हजारों लोकांचें जीवित अवलंबून आहे त्या माझ्या पराक्रमशाली बंधूला दोन यवनांच्या हातून मरण येतांना मला कसें पाहावेल ? मीं त्या दोघां मोंगलांनां मारलें आहे आणि प्रतापाचा घोडा मेल्यामुळें मी त्याला माझा स्वतःचा घोडा देऊन आलों आहें. " सलीमानें शक्तिसिंहाला अभयवचन दिल्यामुळें त्याला कांहींएक करतां आलें नाहीं, परंतु त्याचें प्रेम

नाहींसें झालें. शक्तिसिंहाला हेंच पाहिजे होतें. तो बादशाही नोकरी सोडून देऊन मेवाडांत प्रतापाजवळ येऊन राहिला.

याप्रमाणें हळदीघांटाचें घोर युद्ध समाप्त झालें. हिंदुस्थानाची स्वतंत्रता कायम राखण्याकरितां पुष्कळ युद्धें झालीं, त्यांत चार युद्धें विशेष रीतीनें आपल्या डोळ्यासमोर येतात—सिकंदर आणि पोरस यांच्यामध्यें पंजाबामध्यें झालेला संग्राम, शाहाबुद्दीन आणि पृथुराज यांचें पानीपत येथें झालेलें तुंबळ युद्ध, अकबर आणि प्रताप यांचा हळदीघांटाचा रणसंग्राम; आणि अहमदशहा अबदाली व सदाशिवरावभाऊ यांचें पानिपताचें तिसरें युद्ध. अनेक कारणांमुळें या चारी युद्धांत हिंदूंनां हार खावी लागली. परंतु त्यांचा पराजय विसरून जाऊन त्यांच्या पराक्रमाचे गुणानुवाद अद्याप गाण्यांत येतात. पण विशेषें करून पृथुराज आणि प्रताप, या शूरवीर पुरुषांचीं उदाहरणें शूरवीर पुरुषांनांही आदर्शभूत झालीं आहेत.

जगतांत मनुष्याची परीक्षा पुष्कळ अंशीं परिणामावर अवलंबून असते. आपल्या अंगावर घेतलेल्या कामांत मनुष्य यशस्वी झाला ह्मणजे आपण त्याची स्तुति करितों. जो मनुष्य युद्ध करून त्यांत विजयी होतो त्याला आपण खराखुरा वीर असें समजतों. परंतु पुष्कळ वेळां यश हें पराक्रमाचें फळ होऊं शकत नाहीं, केवळ योगायोगावर अवलंबून राहतें. प्रताप हळदीघाटाच्या लढाईत हरला तरी आपण त्याची स्तुति कां करितों! अनेक संकटें त्याच्या मार्गांत होतीं; शत्रु साधनांनीं आणि संख्येनेंही जास्त प्रबळ होता. जय मिळणें कठीण आहे असेंही त्याला वाटलें असेल; तरी पण त्यानें शत्रूला तोंड दिलें आणि मोठे पराक्रम केले. तो हरला तरी आपण त्याचें स्तुतिस्तोत्र गातों. त्याचे शत्रूही त्याचा पराक्रम पाहून चकित होऊन गेले होते आणि 'शाबास, शाबास' असे उद्गार काढीत होते.

असें कशाकरितां चाललें होतें? कारण इतकेंच कीं जी भावना सिद्ध करण्याकरितां तो लढाईत उतरला

होता ती भावना पवित्र आणि पूज्य होती. आणि म्हणूनच त्यानें जे जे प्रयत्न केले ते ते मोठे प्रबळ होते. आणि त्यानें जें साहस केलें तें आश्चर्यचकित करून टाकणारें होतें. वाचकांस सहज कळून येईल कीं, ती भावना म्हणजे स्वधर्मरक्षण आणि स्वदेशस्वातंत्र्य ही होय.

कोणत्याही कार्याची प्रशंसा त्याच्या परिणामावरून करण्यापूर्वी थोडासा विचार करावा लागतो. कार्याच्या मागें कोणकोणत्या भावना आहेत आणि त्या सिद्ध करण्यास कसकसे प्रयत्न होत आहेत हें पाहून कार्याच्या बरेवाईट-पणाबद्दल अभिप्राय बांधला पाहिजे. अशा रीतीनें हळदी-घांटाच्या युद्धाचा विचार केला तर हें युद्ध प्रतापाचें विजयसूचक झालें असेंच म्हणावें लागेल. त्यानंतर दरेका-च्या तोंडून प्रतापाविषयीं स्तुतिस्तोत्रें ऐकूं येऊं लागलीं. कवी लोक त्याच्याच पराक्रमाचें वर्णन गाऊं लागले. माता आपल्या बालकांना प्रतापासारखें होण्याचा उपदेश करूं लागल्या, आणि स्त्रिया आपल्या पतीनें प्रतापासारखेंच शूर असावें अशी इच्छा करूं लागल्या. यापेक्षां मोठा विजय कोणता असूं शकेल !

यानंतर प्रतापसिंह राहिलींसाहिलीं माणसें बरोबर घेऊन उदयपूर सोडून कमलमेराच्या किल्ल्यांत राहण्यास आला. या किल्ल्यालाही मोंगल सेनापति कोकाशाह आझमखान यानें वेढा दिला. पुष्कळ दिवस प्रताप या किल्ल्यांत टिकून राहिला; परंतु देवराज नामक एक स्वदेशद्रोही रजपूत मोंगलास मिळाला आणि किल्ल्यास जें पाण्याचें साधन होतें त्यांत वीष टाकलें, यामुळें हें ठिकाणही त्याला सोडावें लागलें.

कमलमेराहून प्रताप चोंड नामक पहाडी किल्ल्यांत गेला. हा किल्लाही अकबराच्या लष्करानें घेरला. सोनागिरा सरदार भानुसिंह यानें या ठिकाणच्या युद्धांत फार शौर्य दाखविलें. तो आणि मेवाडचा मुख्य कवी या वेळ्यांत मारले गेले. या कवीनें प्रतापाविषयीं केलेलीं काव्यें वीररसप्रधान आहेत, आणि अद्यापि हीं काव्यें मेवाडांत मोठ्या हौसेनें गातात. सैन्याच्या अग्रभागीं राहून हा राजकवी वीररसानें युक्त अशीं काव्यें इतक्या शैलीनें ह्मणत असे कीं, भिऱ्या-च्याही अंगीं वीराश्रि चढावी.

चौंडाच्या घेऱ्यांत मुसलमानी सैन्याला असें वाटलें कीं प्रतापाला जिवंत पकडतां येईल. कारण किल्लयाच्या चारी बाजूला दाट माणसें होतीं, आणि मेवाडांतील मुख्य मुख्य शहरें आणि किल्ले मोंगलसैन्याच्या ताब्यांत आले होते. पण प्रताप अपूर्व रणचातुर्य वापरून त्यांच्या पंजांतून निसटून गेला, आणि चौंड जिंकून परत फिरणाऱ्या मुसलमानी सैन्याला पाहाडी मार्गांत घेरून त्याचा संपूर्ण नाश केला.

प्रतापाला पकडण्यास आतां मोंगल फारच आतुर झाले. इतके प्रयत्न करीत असतां प्रताप त्यांच्या हातून कसा बिसटून जातो याविषयीं त्यांनां मोठा अचंबा वाटूं लागला. प्रताप कांहीं तरी जादु करून सर्वांच्या डोळ्यांत धूळ टाकून पळून जातो असें मोंगलांना वाटूं लागलें. पर्वतांच्या शिखरांवर व गुहेंत भटकणारा प्रताप संधि साधून मोंगलसैन्यावर तुटून पडत असे आणि साधेल तितका संहार करून विजेप्रमाणें पुनः नाहींसा होई. त्याची झडप आणि एकदम नाहींसें होण्याची युक्ति यांत मोंगल

सैन्यास जादु भरलेली दिसत होती. परंतु त्याचें साहस आणि पराक्रम हींच त्याची जादु होती.

याप्रमाणें अनेक वर्षेंपर्यंत चाललें होतें. प्रतापाला जिवंत पकडण्याची मुसलमानांची इच्छा सफल झाली नाहीं, परंतु प्रतापाच्या दुःखांनांही पारावार नव्हता. बलिष्ठ आणि प्रख्यात राज्याचा राज्यकर्ता, याची स्थिती एखाद्या भटकणाऱ्या लुटारूप्रमाणें झाली होती. त्याचा सुपीक प्रदेश शत्रूंच्या हातांत गेला होता; एकामागून एक त्याचीं आश्रयस्थानेंही मोंगलांच्या ताब्यांत जात होतीं. जंगल आणि पर्वत यांतच त्याच्या राज्याचा समावेश झाला होता. अनेक दीन माणसांना दान देणारा प्रताप लक्ष्मीहीन झाला होता. त्याचे पराक्रमी सरदार आणि सल्लागार मंडळ यांतील पुष्कळजण अनेक युद्धांत कामास आले होते. त्याचें सैन्य बोटावर मोजण्याइतकेंच शिल्लक राहिलें होतें. पर्वत आणि जंगल यांत वास करून राहणारे साधे, निमकहलाल भिल्ल प्रताप आणि त्याचें लष्कर यांस आश्रय देत होते. प्रतापाचें कुटुंब प्रतापाबरो-

बरच होतें. प्रतापसिंहाची राणी, त्याचा राजपुत्र आणि राजकुमारी प्रतापाच्या दुःखाचे वांटेकरी होण्यास त्याच्या-बरोबर जंगलांत वास करीत होतीं.

ज्या राणीनें अनेक सुखविलास पाहिले होते, सुंदर सुंदर महालांत आणि बागबगीच्यांत दिवस घालविले होते, आणि अनेक दासदासी जिच्या शुश्रूषेला नेहमीं हजर असत, ती राणी आज गहन अरण्यांत, पर्वताच्या गुहेत कठिण दगडावर निजली होती, हातानें स्वैपाक तयार करून मुलांबाळांना आणि पतीला जेवण वाढीत होती, आणि रानटी व अशिक्षित अशा भिल्लिणींबरोबर आपला वेळ घालवीत होती. राण्याचीं कुसुमाप्रमाणें सुकुमार बाळकेंही भिल्लांच्या पोराबाळांबरोबर खेळून आपल्या आयुष्याचे दिवस मोठ्या लीलेनें आणि साधेपणानें घालवीत होतीं. त्या राजकुटुंबाला मेवामिठाई व पंचपक्वान्नें यांत आश्चर्य नव्हतें. त्या राजकुटुंबाला आज आपले दिवस जंगलांतील कंदमुळें आणि भाजीपाला खाऊन दिवस काढावे लागत होते. 'कर्मणो गहना गतिः' म्हणजे दैवलीला विचित्र

आहे असें ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. प्रतापाचें हृदयही आपल्या कुटुंबाची अशी स्थिति पाहून गहिंवरून येत असे. परंतु त्याची राणी त्याच्या दुःखांत त्याला धीर देत असे, आणि वाटेल तितके कष्ट सोसावे लागले तरी शत्रूला शरण जावयाचें नाहीं अशा प्रकारचें उत्साहपूर्ण आश्वासन त्याला नेहमीं देत असे.

अशा स्थितींतही मुसलमानांच्या हल्ल्याची भीति होतीच. प्रतापाचें राहण्याचें ठिंकाण फार बिकट होतें. तरी वारंवार मोंगल सैन्याच्या टोळ्या त्या ठिकाणावर छापे घालीतच असत. रजपूतांचे तीर व भिल्लांच्या गोफणी अशा हल्ल्यांचा प्रतीकार करीतच असत. तरी पण समोरून येणारें सैन्य विशेष बळवान् असलें म्हणजे स्थान सोडून पळून जावें लागे. असें अनेकवेळां होत असे. मुसलमानांच्या हातांत आतां सांपडणार तोंच प्रतापाचे विश्वासु भिल्ल जिवावर उदार होऊन राणी आणि राजबालक यांनां पर्वताच्या सांधीकोंपऱ्यांत कोठेंतरी लपवून ठेवीत.

असें होतें तरी कोणी दुःखी कष्टी नव्हतें. प्रतापाचे सरदार व फौजफाटा नेहमीं त्याच्या संन्निधच असे आणि जें जें दुःख येऊन पडे तें तें ते आनंदानें सहन करीत.

अकबर मोठा गुणग्राही राजा होता. स्वतःच्या शूर शत्रूलाही तो चाहात असे. प्रतापाच्या डोक्यावर इतक्या आपत्ति कोसळल्या तरी त्याचें शौर्य, धैर्य, सहनशीलता आणि अद्‌भुत साहसवृत्ति हे गुण मुळींसुद्धां कमी न झालेले पाहून अकबराला आनंद झाला, आणि प्रतापाविषयीं त्याच्या मनांत मोठा आदर उत्पन्न झाला. त्यानें राण्याची खरी स्थिति कळण्यासाठीं एक जासूद गुप्त रीतीनें पाठविला. जासुदानें प्रतापाची राहण्याची जागा शोधून काढली, आणि दूर उभें राहून त्यानें बारकाईनें निरीक्षण केलें. त्याच्या पाहण्यांत आलें कीं, एका प्रचंड वृक्षाच्या छायेखालीं आपल्या सरदारांनां बरोबर घेऊन प्रताप भोजन करण्यास बसला आहे, भोजनास जंगलांतील कंदमूळें व फळेंच होतीं तरी मेवाड देशाच्या रिवाजाप्रमाणें प्रताप आपल्या सरदारांनां द्रोण देत आहे. सरदार अत्यंत

प्रसन्नतेनें त्या द्रोणांचा स्वीकार करून स्वतःला मोठा मान मिळाला असें समजून मिटक्या मारीत बसले आहेत, आणि जवळच्या झाडाच्या फांदीला झोंपाळा टांगून प्रतापाचीं मुलें भिल्लांच्या मुलांबरोबर झोंके घेऊन मोठा गोंगाट करून राहिलीं आहेत.

आपत्कार्ळींही हा राजविलासी थाट पाहून तो जासूद चकीतच झाला. अकबराच्या दरबारांत जाऊन त्यानें या सर्व गोष्टींचें हुबेहुब वर्णन केलें. हें ऐकून अकबर आणि सर्व सभासद यांच्या तोंडून शाबासकीचे उद्गार निघाले.

महापुरुषांची कसोटी दुःखांनींच होत असते. सोनें जसजसें अधिक तापवावें तसतसें तें ज्यास्त शुद्ध होत जातें. महापुरुषांनां जसजशीं अधिक दुःखें येत जातात तसतसा त्यांचा मोठेपणा ज्यास्त दृष्टोत्पत्तीस येत जातो. राण्याचीं दुःखें दिवसेंदिवस कमी होण्याऐवजीं वाढतच चाललीं अशा स्थितींत वर्षानुवर्षें गेलीं तरी त्याच्या आसपास पसरलेलें दुःखांचें भयंकर वादळ कमी न होतां दिवसेंदिवस जोरावतच चाललें. त्यांचें हृदय आतां चिंतामग्न होऊं लागलें.

ही चिंता तर कांहीं स्वतःच्या सुखाविषयीं नव्हती. स्वतः तर तो वाटेल तसे भयंकर प्रसंग सोसण्यास तयार होता. मरण्याची भीति सर्वांत मोठी समजली जाते. मरण्याला तर हा मोठ्या आनंदानें तयार होता. परंतु कित्येक पुरुष अशा स्थितींत येऊन पडतात कीं, ते मरण्यास सिद्ध झाले तरी त्यांना भित्रे समजलें जातें. त्यांनां दुसऱ्या करितां तरी जिवंत रहावें लागतें. प्रतापाची चिंता त्याच्या कुटुंबाकरितां आणि त्याच्या अनुयायांकरितां होती. प्रतापाच्या मनांत एकाद्‌वेळ विचार येई कीं ' काय! राण्याचें सर्व आयुष्य अशा दुःखांतच जाणार काय? माझीं प्राणप्रिय लेंकरें घांसाचा तुकडा मोडून दिवस काढतात काय! असें दुःख भोगण्याकरितांच मी त्यांना जन्म दिला आहे काय! माझे पराक्रमी आणि निमकहलाल सैनिक माझ्याकरितां तर प्राण देऊन राहिलेच आहेत. त्यांना या कामगिरीबद्दल कांहीं मोबदला देण्याचें माझे नशिबीं असेलसें वाटत नाहीं. मी त्यांनां किती दिवस दुःखांत ठेऊं!" मेवाड स्वतंत्र करण्याची चिंता, आणि स्वतःच्या कुटुंबाला दुःखमुक्त करण्याची

चिंता-या दोन चितारूपी चितेमध्यें या महापुरुषाचे प्राण जळत होते.

एके दिवशीं मोंगलांच्या एका टोळीनें राण्यावर हल्ला केला. तो सहकुटुंब भोजन करण्यास बसला होता, इतक्यांत शत्रूनें अचानक त्यांना घेरा घातला. या घेऱ्यांतून निसटून ते दुसऱ्या ठिकाणीं गेले, आणि त्या ठिकाणीं पुनः जेवण तयार करून त्यांनीं वाढून घेतलें जेवण्यास सुरुवात करणार तोंच पहिली मोंगल टोळी फार वेगानें येतांना दिसली. वाढलेलें अन्न तसेंच राहिलें, आणि सहकुटुंब त्यांना तेथून हलावें लागलें. असें पांच वेळां त्यांनां अन्नाशिवाय पळून जावें लागलें.

सरतेशेवटीं त्यांना सहज कोठें विश्रांति मिळाली. एका दाट जंगलांत राण्यानें सहकुटुंब तळ दिला. राणीनें एक प्रकारच्या गवताच्या मुळ्यांतून पीठ काढून त्याच्या भाकरी बनविल्या आणि त्या सर्वांना वाढल्या. त्यांतून राहिलेली अर्धी भाकर आपल्या सर्वांत लहान मुलीकरितां झांकून ठेविली.

गवताची पथारी तयार करून राणा त्यावर आडवा झाला आणि आपल्या हतभागी देशासंबंधानें विचार करीत राहिला. इतक्यांत त्यानें आपली लहान मुलगी रडतांना ऐकिलें. राणा तिला उगी रहाण्याकरितां प्रयत्न करीत होता, परंतु कांही केल्या ती उगी राहिना. प्रतापानें विचारिलें कीं, " बाळे, कां रडतेस ! ' तिनें रडत रडत उत्तर दिलें कीं ' माझ्याकरितां झांकून ठेविलेली भाकर मांजरानें खाल्ली. मला कोणी दुसरी भाकर देत नाहीं; मला फार भूक लागली आहे. अँ अँ अँ अँ ! "

आपल्या बालकांचा अश्रु आईबापांचें हृदय अग्नी-प्रमाणें भाजीत असतो. त्यांतूनही भुकेनें व्याकूळ झालेलें आपलें मूल पाहून तर त्यांच्या दुःखाची सीमाच होते. आपल्या कन्येचें असें भाषण ऐकून प्रतापाचें हृदय फाटून गेलें. ज्या वीरपुरुषानें हळदीघाटांच्या लढाईत पराभव झाला तरी मनांत शोक केला नव्हता, तोच वीरपुरुष आज आपल्या मुलीला रडतांना पाहून शोकानें विव्हल झाला होता! राज्याचा त्याग करून अरण्यांत गेला तरी जो प्रताप

हंसतमुख होता, त्याच प्रतापाच्या डोळ्यांतून मुलीचें रडणें पाहून अश्रुपात चालला होता! आईबापाचें अंतःकरण आईबापच जाणूं शकतात. "हजारों माणसांचा पोषण करणारा जो मी, त्या माझ्या नशिबीं आज प्रत्यक्ष मुलांनें अर्ध्या भाकरीकरितां रडतांना पाहण्याचें यावेना! जो कुलमर्यादा आणि राज्यस्वातंत्र्य याप्रीत्यर्थ युद्ध करीत आहे त्या मला बालकांना उपाशीं मरतांना पाहून काय प्राप्त करून घ्यावयाचें आहे!" अशा विचारांनीं त्याचें कोमल हृदय पितृप्रेमानें गहिंवरून आलें.

मोठ्या पुरुषांचीं अंतःकरणें, 'वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि' ह्मणजे वज्रापेक्षांही कठोर आणि फुलापेक्षांही कोंवळीं अशीं असतात. तशाच प्रकारचें अंतःकरण प्रतापाचें होतें. त्यानें निश्चय केला कीं, "ज्या कार्याप्रीत्यर्थ मी झटत असतां माझ्या निरपराधी आप्तांना असे हाल काढावे लागतात तें कार्य सोडून द्यावें लागलें तरी बेहेत्तर." या निश्चयावरून त्यानें अकबराला एक पत्र लिहिलें आणि त्यांत तहाची मागणी केली.

हें पत्र हातीं पडतांच अकबराच्या आनंदास पारावार नव्हता. भर सभेंत हें पत्र वाचलें तेव्हां सर्व सरदार आणि मांडलिक यांना मोठा आनंद झाला. ज्या प्रतापाला नमविण्यास मोठमोठीं सैन्यें निष्फळ झालीं होतीं, मोठमोठे योद्धे आणि सेनापति यांनीं हात टेकले होते आणि मोंगल-मुत्सद्यांचें चातुर्य लोपून गेलें होतें, त्या प्रतापाला तहा-करितां मागणी करितांना पाहून लहान मोठ्या सर्वांनां आनंद झाला. अकबरही जेथें तेथें हीच गोष्ट बोलूं लागला.

अकबराच्या दरबारांत बिकानेराच्या राजाचा धाकटा भाऊ पृथ्वीराज, मांडलिक या नात्यानें रहात होता. पृथ्वीराज एक मोठा वीर आणि स्वदेशभक्त होता. तो मांडलिक होता तरी त्याचे स्वतंत्र विचार आणि आचार या-मुळें अकबरासह सर्वांनां त्याची भीति वाटत असे, आणि मोठा मान मिळत असे. शिवाय पृथ्वीराज विद्वान आणि उत्तम प्रकारचा कवीही होता. त्याची कविता फारच परि-णामकारक असे. महाराणा प्रतापाचें शौर्य, औदार्य आणि महात्म्य तो फारच चांगलें जाणत होता, आणि प्रताप हा

स्वतःला पूज्य उदाहरण आहे असें समजून त्याची नेहमीं वाहवाच करी.

पृथ्वीराजाची पत्नी ही सिसोदिया कुलांतील होती. प्रतापाचा भाऊ शक्तिसिंह याची ती मुलगी. तिचें सौंदर्य आणि गुण याविषयीं तिची ख्याती होती. अकबराला तिची परिक्षा पाहण्याची एकदां इच्छा झाली.

अकबरानें ' खुशरोझ ' नामक उत्सवाची स्थापना केली होती. प्रत्येक महिन्याला स्त्रियांचा दरबार भरत असे; आणि अकबराची बेगम ( राणी ) मोठ्या थाटांत अध्यक्ष-स्थान घेत असे. शिवाय एके ठिकाणीं स्त्रियांचा मेळा भरत असे, आणि हिंदु आणि मुसलमान स्त्रिया अनेक कुशलतेच्या वस्तु आणून विकीत. राजकुलांतील स्त्रिया त्याचप्रमाणें सरदार लोकांच्याही स्त्रिया व मुली या मेळ्यांत येऊन पाहिजे ती वस्तु विकत घेत. या मेळ्यांत स्त्रियां शिवाय दुसऱ्या कोणालाही जाऊं देत नसत.

एके दिवशीं या खुशरोझाच्या बाजारांत पृथ्वीराजाची सुंदर पत्नी आली. अकबर गुप्त वेषांत फिरत होता. त्याच्या

दृष्टीस पृथ्वीराजाची पत्नी पडली. तिची परीक्षा पाहण्याचें अकबराच्या पुष्कळ दिवसांपासून मनांत होतें. या दिवशीं त्यानें संधि साधिली. मेळा आटोपल्यावर ती स्त्री आपल्या घराकडे जाणाऱ्या रस्त्यानें जाऊं लागली. परंतु थोडेंसें पुढें जातांच तिला कळून आलें कीं, सर्व बाजूचे दरवाजे बंद आहेत आणि बाहेर जाण्यास एकही मार्ग मोकळा नाहीं. ही स्थिति पाहून तिच्या मनांत अनेक शंका येऊं लागल्या. एकदम समोरचें दार उघडलें आणि त्यांतून बादशाह अकबर येतांना दिसला. अशा एकांतांत अकबराला येतांना पाहून त्याच्या-विषयीं तिच्या मनांत संशय उत्पन्न झाला, आणि जेव्हां अकबरानें तिच्या जवळ जाऊन अमर्यादपणें बोलण्यास सुरुवात केली, तेव्हां तिचा संशय खरा ठरला.

परंतु ही रजपूत स्त्री कोणाला डरणारी नव्हती. तिच्या नसानसांत सिसोदिया कुळाचें रक्त खेळत होतें आणि पृथ्वीराजासारख्या वीर आणि सत्वशील पुरुषाची ती पत्नी होती. अकबराचें निंद्य भाषण ऐकतांच तिचें डोकें फिरून गेलें, अत्यंत क्रुद्ध होऊन स्वतःच्या कमरेंत लपविलेली

कट्यार बाहेर काढली, आणि एखाद्या सिंहिणीप्रमाणें पुढें सरसावून अकबराच्या छातीसमोर कट्यार धरिली आणि अत्यंत तिरस्कार दर्शवून ती बादशाहाला ह्मणाली, कीं " रे दुष्टा, या क्षणींच तुझीं शंभर वर्षे भरलीं असें समज. तुझ्या छत्राखालीं राहणाऱ्या स्त्रीपुरुषांनां तूं बालकासमान मानिलें पाहिजेस. त्या ऐवजीं तूं अशी पापी दृष्टि ठेवितोस! जर तुला जगावयाचें असेल तर आतांच माझ्यासमोर शपथ घे कीं, आजपासून कोणत्याही रजपूत स्त्रीची मस्करी करणार नाहीं. नाहीं तर ही पाजळलेली कट्यार तुझ्या छातींत भोंकसून आतांच मी तुझा प्राण घेतें.

जीव जाण्याच्या भीतीनें थरथर कांपणाऱ्या बादशाहानें या वीरांगनेनें सांगितल्याप्रमाणें शपथ घेतली, तेव्हां जिवंत सुटला. पृथ्वीराजाच्या पत्नीचे गुण त्यानें फक्त ऐकिले होते ते आज प्रत्यक्ष पाहिले आणि अशी सुंदर आणि पवित्र पत्नी पृथ्वीराजाला प्राप्त झाली, याबद्दल त्याला तो मोठा भाग्यशाली समजूं लागला.

पृथ्वीराज महाराणा प्रतापाची वारंवार स्तुति करीत

असे ह्मणून अकबरानें गर्वानें फुलून जाऊन प्रतापाचे संधिपत्र पृथ्वीराजाला दाखविलें. पत्र पाहून पृथ्वीराजाला अत्यंत वाईट वाटलें. त्याला तर नक्की ठाऊक होतें कीं प्रताप कधींही शरण येणार नाहीं. तरी पण कांहीं क्षुल्लक कारणास्तव त्यानें कदाचित हें पत्र लिहिलें असलें तर त्यामुळें सर्व आयुष्यांत मिळविलेल्या कीर्तीवर पाणी फिरेल असें न व्हावें, असें पृथ्वीराजाला वाटलें.

पत्र वाचून पृथ्वीराजाच्या चेहऱ्यावर संशयाची छटा पसरली हें पाहून अकबराचा गर्व आणि आनंद अर्धा नष्ट झाला. धीर धरून मोठ्या सरळपणानें आणि निर्भीडपणें पृथ्वीराज ह्मणाला, " हें पत्र प्रतापनें लिहिलें आहे असें मला वाटत नाहीं. मी प्रतापाला पूर्ण ओळखतों. तो असें पत्र प्राण गेला तरीही लिहिणार नाहीं. हें त्याच्या एकाद्या वैऱ्याचें काम असलें पाहिजे. आपण आपला राजमुगुट त्याच्या डोक्यावर ठेविला तरी सुद्धां प्रताप दिल्लीच्या सिंहासनापुढें येऊन आपलें मस्तक नमवील असें कधींही होणार नाही.

बोलतां बोलतां असें ठरलें की, ही गोष्ट खरी आहे कीं खोटी आहे हें निश्चित कळण्याकरितां पृथ्वीराजानें प्रतापाला पत्र लिहून विचारावें. पृथ्वीराजाला हेंच पाहिजे होतें. तो एक मोठा कवि होता. त्याच्या शब्दांत भित्र्यालाही शूर वीर बनविण्याचें सामर्थ्य होतें. त्यानें तेजस्वी, उदात्त आणि उत्तेजक विचारांनीं परिपूर्ण अशा कवितेंत एक पत्र लिहिलें. त्याचा सारांश हा होता:--" ज्या प्रतापावर हिंदुस्थानाची आशा आहे तो प्रताप काय दिल्लीस येऊन बादशाहाच्या पायावर आपलें डोकें ठेवणार ! सर्व रजपूतांनीं तर बांगड्या भरल्या आहेत. त्यांत फक्त एक प्रताप आपलें क्षत्रियत्व सांभाळून आहे. तें भ्रष्ट न व्हावें ह्मणून ज्यानें राज्यपद, धनदौलत आणि सुखवैभव यांचा त्याग करून अरण्यवास पतकरिला, तो प्रताप काय सरतेशेवटीं आपली तरवार खालीं करणार ! सिसोदिया कुलाची पवित्रता कायम राहील अशी सर्वांची आशा होती. कारण कीं बाप्पा रावळ आणि समरसिंह यांना अभिमान उत्पन्न करील असा प्रताप त्यांच्या वंशांत जन्मला आहे, तो प्रताप काय शेवटीं आपल्या कुळाला कलंक लागूं देणार ! "

अशा आशयाचें पत्र लिहून त्यानें एका जासूदाबरोबर राण्याकडे रवाना केलें. पत्र वाचतांच राण्याच्या शरीरांत नखशिखांत चेतना उत्पन्न झाली. दुःखानें कष्टी झालेल्या त्याच्या हृदयांत नवीन जोम आला. त्याचे डोळे पुनः आरक्त झाले; त्यानें ओंठ चावला आणि मिशीवर ताव दिला. आकाशपातळ एक होतील तरी शत्रूला शरण जावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला. पत्र वाचून प्रतापाचे कुटुंबांत आणि सरदारांमध्येंही जागृति उत्पन्न झाली, आणि प्रतापाच्या तोंडावर वीरश्रीचें नवीन तेज पाहून “ महाराणा प्रतापकी जय ” अशी गर्जना करून सर्व उठले.

या गर्जनेचा प्रतिध्वनि ऐकून निश्चिंत बसलेले सर्व मुसलमान लोक खडबडून उठले. पुनः युद्ध दुप्पट जोरानें चाललें. एकही बाजू माघार घेत नव्हती. मेवाडाची भूमि उजाड झाली. प्रतापालाही या युद्धापासून कांहीं लाभ झाला नाहीं. मुसलमानांचें एक लष्कर खपलें तर त्या ठिकाणीं दोन येऊन उभीं रहात, प्रतापाला मात्र आपल्या

निवडक माणसांजवळूनच काम घ्यावयाचें होतें. त्याला वाटलें कीं, मेवाडांतल्या मेवाडांतच राहून कांहीं फायदा होणार नाहीं. ज्या देशांत रहाण्यापासून चारी बाजूंनीं शत्रूची धास्ती राहील, शत्रूला हरविण्याचीं आणि थकविण्याचीं साधनें यांचा नाश होऊन जाणार, आणि स्वतःचा उद्देश साध्य करण्यास एकही उपाय उरणार नाहीं, त्या देशांत राहण्याचा हट्ट धरून विनाकारण हाल सोसावे हें प्रतापाला योग्य वाटलें नाहीं. देशाच्या बाहेर राहिल्यावर इतर माणसेंही येऊन मिळतील, शत्रूला नानाप्रकारें त्रास देण्यास ठीक पडेल आणि स्वदेशाला स्वतंत्र करण्यास अनुकूल स्थिति प्राप्त होईल असें त्याला वाटलें.

हा विचार त्यानें आपल्या सरदारांपुढें मांडला आणि या स्तुत्य विचारास सर्वांनीं संमति दिली. सिंधु नदीच्या किनाऱ्यावर असलेल्या सगदी राज्यांत जाणें अधिक सुरक्षितपणाचें वाटल्यावरून तेथें जाण्याची तयारी झाली.

सर्व तयारी झाल्यावर प्रताप आपले सरदार व परिवार मंडळी यांना बरोबर घेऊन अरवलीच्या एका उंच

शिखरावर चढला. जातां जातां एकदां आपल्या मातृभूमीला न्याहाळून पहावें अशी त्याला इच्छा झाली. 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी' म्हणजे मातृभूमि ही स्वर्गापेक्षांही श्रेष्ठ मानितात. अशा जन्मभूमीला सोडून जाण्याचा प्रसंग आलेला पाहून प्रतापाला फार वाईट वाटलें. ज्या भूमींत त्याचा जन्म झाला होता, ज्या भूमीचें त्यानें पालन केलें होतें, आणि जिचें स्वातंत्र्य बाळगण्यास त्यानें अनेक लढाया मारल्या होत्या ती मातृभूमि स्मशानवत् सोडून जातांना पाहून त्याच्या डोळ्यांतून अश्रु पडले. पुष्कळ वेळ त्यानें मेवाडाकडे पाहिलें, सरतेशेवटीं त्याच्या तोंडातून उद्गार निघाले कीं, 'हे माते! शेवटचा तुला नमस्कार असो! वंदे मातरम्' हें ऐकून सर्वांचीं हृदयें गहिंवरून आलीं.

मोठ्या दुःखी अंतःकरणानें सर्वजण पर्वताखालीं उतरले, आणि पुढें चालूं लागले. थोड्या वेळांत ते मेवाड आणि मारवाड यांच्या सरहद्दीवर आले. परंतु यापेक्षां पुढें जाण्याची प्रतापाला जरूर पडली नाहीं. या वेळेपासूनच

प्रतापाचा सुयोग त्याच्या नशिबीं लिहिलेला होता. आतां त्याच्या दुःखांचा शेवट होणार होता. त्याची पूर्ण कसोटी झाली होती.

प्रताप मंडळीसह मेवाडाच्या सीमेवर आला, इतक्यांत पाठीमागून एक घोडेस्वार भरधांव घोडा फेंकीत प्रतापाकडे येतांना दिसला. हें पाहून सगळे घाबरले, आणि सावध होऊन आपलीं हत्यारें सज्ज केलीं. तो घोडेस्वार अधिकच जवळ जवळ येत चालला. हा मित्र आहे कीं शत्रु आहे अशी सर्वांनां शंका येऊं लागली. जवळ येतांच त्याचा पोषाख आणि चेहरा परिचित दिसूं लागला. तो सर्वांच्या मध्यें येऊन उभा राहिला आणि घोड्यावरून उतरून प्रतापाच्या चरणावर मस्तक ठेविलें. हा घोडेस्वार दुसरा कोणी नसून प्रतापाचा विश्वासु प्रधान भामाशा होता.

भामाशाला आलेला पाहून सर्वांनां आनंद झाला. त्यानें लागलीच प्रतापाच्या समोर अपरिमित द्रव्याचा ढीग रचला. भामाशा हें काय करीत आहे याविषयीं सर्वांनां आश्चर्य वाटलें. प्रतापानें विचारिलें. ' भामाशा, हें सर्व

काय आहे ? ' भामाशानें उत्तर दिलें, ' महाराज, आतां आपणास मेवाड सोडण्याची जरूर नाहीं. या द्रव्यानें बारा वर्षेंपर्यंत पंचवीस हजार सैनिकांचा निर्वाह करितां येईल. ' भामाषा आपलें सर्व धन प्रतापाला अर्पण करितांना पाहून सर्व जण त्याच्या उच्च स्वामिभक्तीविषयीं स्तुति करूं लागले. प्रताप म्हणालाः--" भामाशा, ही तुमची सर्व संपत्ति मला कां देतां ? सर्व स्थिति जाणत असतां मुद्दाम होऊन तुम्ही तुम्हाला आणि तुमच्या कुटुंबाला दुःखांत कां लोटतां ? "

परंतु भामाशा कांहीं हलकट, धनलोभी, कंजुष मारवाडी नव्हता. त्यानें तर एखाद्या वीर पुरुषाला शोभेल असा स्पष्ट जबाब दिला कीं, " महाराज, हा सर्व पैका आपलाच आहे. सिसोदिया कुळाची जी अल्प सेवा बजाविली त्याचा मोबदला म्हणून आपण आणि आपल्या पूर्वजांनीं मोठ्या उदारतेनें आमच्यावर द्रव्याचा पाऊस पाडला. हें आपलेंच धन आपल्या खऱ्या समयास कामास नाहीं येणार तर केव्हां येणार ? सिसोदियाच्या अन्नावर पोसलेला हा देह, सिसोदियाचें दुःखानें दुःखी आणि

सुखानें सुखी--महाराज, मनांत संकोच न बाळगतां आपण या धनाचा स्वीकार करा, आणि मेवाडाचा उद्धार करा."

प्रतापानें ही संपत्ती घेण्याचें पुष्कळ नाकारिलें; परंतु निमकहलाल प्रधानापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. वंशपरंपरेच्या नोकरांमध्यें पुष्कळ घेण्यालायक तत्वें भरलेलीं आहेत. आपल्या नोकरांच्या पोराबाळांचा संभाळ करणें राजाच्याच शिरावर असे, आणि त्याच्याबद्दल नोकर लोक आपल्या स्वामिकार्याकरितां बेलाशक आपले प्राण देत. सेव्यसेवकाचा भाव विसरून जाऊन त्या ठिकाणीं पितापुत्राचा भाव उत्पन्न होत असे. अशा प्रकारचे हृदयंगम आणि कवींना वर्णन करण्यालायक सेवेचे पुष्कळ प्रसंग होऊन गेले आहेत. भामाशाचा हा मोठा स्वार्थत्याग एक असाच प्रसंग होता.

खऱ्या धनवान लोकांचा मोठेपणा धनसंचय करण्यांत नसतो, परंतु परोपकारार्थ त्याचा उपयोग करण्यांत खरा मोठेपणा आहे. पैशानें फुगून जाणाऱ्या माणसांनीं हें पक्कें

लक्षांत ठेवावें कीं, पैशाचा सदुपयोग करणारा श्रीमंत मनुष्य त्यांच्यापेक्षां हजार पटीने बरा. पंचवीस हजार माणसांचें बारा वर्षे पोषण होईल इतकी संपत्ति देऊन टाकणें हा कांहीं असा तसा स्वार्थत्याग नव्हे. या स्वार्थत्यागामुळें भामाशाला 'मेवाडाचा उद्धारक' अशी संज्ञा प्राप्त झाली आहे. या पदवीला तो सर्वस्वी पात्र आहे.

प्रतापसिंहानें या पैशाचा उपयोग सैन्य गोळा करण्यांत केला आणि मेवाडाबाहेर जाण्याचा विचार रद्द केला. अल्पावकाशांत प्रतापानें युद्धसामुग्री जमविली आणि देवीर ठिकाणीं विजयानें धुंध झालेल्या मोंगल सेनेस वेढा दिला. मोंगल सेनापति शाहबाझखान यानें उडत उडत गप्प ऐकिली होती कीं, प्रताप मेवाड सोडून जात आहे. यामुळें तो निश्चिंत राहिला होता, परंतु जेव्हां त्यानें राण्याचा सिंहनाद ऐकिला तेव्हां तो फार भयभीत झाला. देवीर ठिकाणीं भयंकर युद्ध झालें, त्यांत सेनापति शाहबाझखान मारला गेला आणि मोंगल लोकांनां मोठी माघार घ्यावी लागली. देवीराच्या संग्रामापासून प्रतापाच्या विजयास सुरूवात झाली. हारलेलें

लष्कर पळत जाऊन आमेर येथें असलेल्या दुसऱ्या मोंगल सेनेस मिळालें. प्रतापानें त्याचा पाठलाग केला आणि आमेर येथील सैन्याचाही धुव्वा उडविला.

आतां मुसलमान सैन्यांत मोठा गोंधळ उडाला. अकबरानें प्रतापाला जिंकण्याकरितां मोठ्या प्रमाणावर सैन्याची उभारणी केली. परंतु इतक्यांत त्याच्या कानावर बातमी आली कीं, कमळमेरच्या किल्ल्याचें संरक्षण करणाऱ्या मोंगल सेनेला प्रतापानें घेरून सेनापति अबदुल्लासह सर्वांनां कापून काढलें आहे.

या प्रतापाच्या विजयानें शत्रु गांगरून गेले. मेवाडाच्या अभिमानी राण्याला नमविण्याची अकबराची आशा नष्ट झाली. सीसोदिया रजपूत कसे शूर असतात हें त्याला बरोबर कळून आलें. पहातां पहातां प्रतापानें मेवाडाचे बत्तीस किल्ले जिंकून परत घेतले. जी भूमि थोड्या वेळापूर्वी सोडण्यास तो तयार झाला होता ती भूमि स्वतंत्र झालेली पाहून प्रतापाला धन्यता वाटली. थोड्या वर्षांनीं चितूर,

अजमीर आणि मंगळगड यांशिवाय सर्व मेवाडदेश त्याच्या अमलाखालीं आला.

अनेक वर्षे दुःखें सहन करून अखेरीस प्रताप विजयी झाला. उदयपूर जिंकून त्याठिकाणीं पुनः राजधानी स्थापिली. सर्व हिंदुस्थान--भर प्रतापाचें नांव गाजून राहिलें, शत्रुसुद्धां संकोच न करतां त्याचे गुणानुवाद गाऊं लागले. अकबरालाही वाटलें कीं हा महान् पुरुष कधीं शरण येणार नाहीं. त्याचे गुणावर अकबर मोहीत झाला, आणि यापुढें प्रतापाला हैराण करण्यांत कांहीं अर्थ नाहीं असा विचार करून त्याच्या विरुद्ध सैन्य पाठविण्याचें रहित केलें, आणि मेवाडांत शांती नांदूं दिली.

परंतु या शांततेच्या काळांत प्रतापाच्या मनाला शांती मिळाली नव्हती. चितूर अद्याप मुसलमानांच्या हातांत होतें. तें जोंपर्यंत त्याच्या स्वाधीन झालें नाहीं तोंपर्यंत त्याला शांती मिळणें शक्य नव्हतें. तें परत मिळविण्याची तर त्यानें प्रतिज्ञा केली होती; परंतु ती प्रतिज्ञा अद्याप सफल झाली नव्हती. म्हणून तो नेहमीं झोंपडींत रहात असे, पत्रावळीवर जेवीत

असे आणि गवताच्या पथारीवर निजत असे. मरेपर्यंत त्यानें हा क्रम चालविला होता. त्याच्या ह्या भीष्मप्रतिज्ञेच्या स्मरणार्थ मेवाडाचे राजे अजूनसुद्धां भोजनाच्या वेळेस ताटाखालीं आणि निजावयाच्या वेळेस पथारीखालीं गवताच्या काड्या ठेवतात.

उदयपूरच्या शिखरावर बसून प्रताप पुष्कळवेळां चितूरकडे नजर टाकी, आणि तेथील दुरवरून दिसणारे विजयस्तंभ पाहून दुःख करी कीं, 'इतकीं दुःखें सहन केलीं तरी माझ्या पूर्वजांच्या राजधानीला मी स्वतंत्र करूं शकलों नाहींना!' हा विचार त्याच्या हृदयास शल्याप्रमाणें टोंचीत होता. दुःखपरंपरा आणि काळजी या योगानें प्रतापाला लवकरच वृद्धावस्था प्राप्त झाली आणि दिवसेंदिवस त्याचें शरीर खचत चाललें. त्याचा मुलगा अमरसिंह विलासी होता आणि दुःखें सहन करण्याची शक्ति त्याला फारशी नव्हती ह्मणून मेवाडाच्या भविष्याविषयीं प्रताप चिंतातुर असे.

थोड्या दिवसांनीं ह्या महान पुरुषाचा अंतकाळ जवळ आला. उदयपूराच्या सरोवराच्या कांठीं बांधलेल्या

एका झोंपडींत मृत्यूची वाट पहात तो निजला होता. आजूबाजूस त्याचे सरदार बसले होते आणि आपल्या पराक्रमी राजाची शश्रूषा करीत होते. इतक्यांत प्रतापाचे सर्व शरीर थरथर कापूं लागलें; जोरानें श्वासोश्वास सुरू झाला. आणि त्याचे डोळे अश्रूंनी भरून गेले. प्राणापेक्षांही प्रियराजाची अशी स्थिति पाहून सरदारांच्याही डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. मन कठीण करून सरदार सलुंबरानें विचारिलें ' महाराज, हा शोक कशाकरितां ? आपल्या पवित्र अंतःकरणांत शांती पाहिजे, त्याठिकाणीं आज इतके अनावर दुःख कां बरें ? ' मरतां मरतांही आपल्या मातृभूमीकरितां अश्रु ढाळणाऱ्या महान स्वदेशभक्त प्रतापानें उत्तर केलें ' प्रिय सरदार हो, माझ्या आवडत्या मेवाड देशाचा विचार माझ्या अखेरच्या वेळींही मला रडायला लावीत आहे. माझ्या देशाचे काय होईल या काळजींत माझा प्राण गुंतून राहिला आहे ? देहांत प्राण आहे तोंपर्यंत मेवाडदेश शत्रूच्या हातीं जाऊं देणार नाहीं अशी दृढ प्रतिज्ञा जर माझ्या समक्ष तुम्ही करीत असाल तर मी शांततेने मरेन.

माझ्या पुत्रावर माझा पूर्ण विश्वास नाहीं. तुम्ही सर्व मजबरोबर पंचवीस वर्षेपर्यंत जंगलापहाडांतून दुःखकष्ट भोगले आहेत म्हणून सिसोदिया कुलाचे वैभव व मेवाडाची स्वतंत्रता मी तुम्हांवरच सोंपवतो.

प्रतापाचें हें भाषण ऐकून सरदार लोकांनीं प्रतापाच्या पायावर हात ठेवून प्रतिज्ञा केली कीं ' राणाजी ! जोंपर्यंत या देहांत प्राण आहेत तोंपर्यंत मेवाडाची स्वतंत्रता आम्ही जाऊं देणार नाहीं, आणि जोंपर्यंत चितूर वगैरे शहरांचा उद्धार करणार नाहीं तोंपर्यंत स्वतः होऊनच आम्ही झोंपड्यांत वास करूं. "

अशी दृढप्रतिज्ञा सरदार लोकांनीं केल्यावर प्रतापाचा चेहेरा प्रसन्न दिसूं लागला, आणि हृदयांतील सर्व चिंता आणि कष्ट दूर होऊन अत्यंत शांत चित्तानें या महाप्रतापी वीर पुरुषानें प्राण सोडले.

जन्मास येणें व मरणें हें जगतांत चालूच आहे. लाखों माणसें जन्मास येतात आणि लाखों मरतात; परंतु ज्या

पुरुषाच्या मरणानें सर्व देशाला हळहळ लागते, त्याच पुरुषानें आपल्या जीविताचें सार्थक केलें असें ह्मणतां येईल. प्रतापाच्या मरणाची बातमी ऐकून केवळ मेवाड देशालाच नव्हे तर सर्व हिंदुस्थानाला दुःख झालें. प्रतापाच्या मित्रांनींच केवळ विलाप केला असें नाहीं, परंतु त्याच्या शत्रूंनींही हळहळ दाखविली.

प्रतापाचें चरित्र अत्यंत मनोवेधक आहे. आयुष्याचा बराचसा भाग ज्यानें युद्ध करण्यांत आणि कष्ट सहन करण्यांत घालविला त्याचें शरीर किती बळकट, कसलेलें आणि मजबूत असलें पाहिजे! बळकट आणि तेजस्वी शरीर हें परोपकारार्थ देह झिजविण्यास अत्यंत जरूरीचें आहे.

बळकट शरीरांत धीर आणि सहनशीलता आपोआपच वास करतात. प्रतापांत तर या दोन गुणांची सीमाच झाली होती. शत्रूचें बळ शतपट असलें तरीही तो कधीं आपली हिंमत खचूं देत नसे. भय ही काय चीज आहे हें तर तो जाणतच नव्हता. त्याच्यासारखी सहनशीलता जगांतील थोड्याच वीर पुरुषांमध्यें असूं

शकेल. सर्व सुखसंपन्न अशा राजवाड्यांत जन्मास येऊन त्याच राजवाड्याचें स्वामित्व प्राप्त झाल्यावर वेळ येतांच ज्यानें या सर्व सुखावर लाथ मारिली आणि रानोमाळ फिरून ज्यानें आपल्या आयुष्याचीं अनेक वर्षें दऱ्याखोऱ्यांत राहून निव्वळ सुक्याकोरड्या भाकरीवर घालविलीं, त्या वीरपुरुषाच्या सहनशक्तीची जोड क्वचितच मिळूं शकेल.

हिंमत आणि सहनशक्ति यांबरोबर शौर्यही असतेंच. प्रताप हा तर प्रतापाचा पुतळाच होता. कोणत्या लढाईंत त्यानें शौर्य दाखविलें नाहीं ? तो हरत असे तरी शत्रु त्याला डरत असे. त्याचें नांव ऐकतांच सर्व चळचळां कांपत असत.

हळदीघांट आणि देवीर येथील लढाया प्रतापाचें शौर्य आणि रणचातुर्य यांचे विजयस्तंभच मानितात. विजय मिळणें न मिळणें, हें अनेक कारणांवर अवलंबून आहे; परंतु इतकें तर खास कीं, पराजयाच्या वेळींहीं मनुष्याचें शौर्य शत्रूस दिपवून टाकतें.

खऱ्या वीरपुरुषांत दैन्य, मनाची दुर्बळता, दुष्टपणा आणि परयाचना या हलक्या वृत्ति सांपडणें शक्य नाहीं. दुसऱ्याची याचना आणि मेहेरबानी यांवर जिवंत राहणें हें वीरपुरुषाचें लक्षणच नव्हे. जो प्रताप आपल्या धर्माचा, कुलाचा आणि जातीचा कट्टा अभिमानी होता तो क्षत्रियत्व नष्ट करण्यास तयार झालेल्या शत्रूला नमणार काय! धर्माभिमान आणि कुलाभिमान यांचें रक्षण करण्याच्या गोष्टी करणें फार सोपें आहे; परंतु ज्या वेळेस खरी परीक्षेची वेळ येते त्या वेळेस गप्पा मारणाऱ्यांचें सामर्थ्य कळून येतें. बोलण्यांत आणि करण्यांत महदंतर असतें. वीरशिरोमणि प्रताप यानें जगताला दाखविलें कीं, अशक्य वाटणाऱ्या गोष्टीही पराक्रमी पुरुष शक्य करून दाखवितात. प्रतापानें शत्रूला आपली मान वाकविली नाहींतर नाहींच; आणि चितूर परत मिळविल्याशिवाय राजवाड्यांत रहावयाचें नाहीं, ताटांत जेवावयाचें नाहीं आणि बिछान्यावर निजावयाचें नाहीं हें व्रत त्यानें मरेपर्यंत पाळलें. हें त्याचें व्रत त्याच्या मोठेपणाची साक्ष पटवितें.

प्रताप हा फार उच्च कोटींतील वीर होऊन गेला. जगतांत निश्चयी, पराक्रमी व सहनशील पुरुष पाहण्यांत येत नाहींत असें नाहीं, परंतु जी भावना त्यांना दृढनिश्चयी आणि पराक्रमी होण्यास प्रेरणा करिते ती थोडीबहुत स्वार्थमूलक असल्यामुळें त्यांच्या मोठेपणाची कमान खालीं जाते. धनलोभ, राज्यलोभ आणि कीर्तिलोभ यांनीं प्रेरीत होऊन पुष्कळ पुरुषांनीं विजय मिळविले आहेत, आणि इतिहासांत पराक्रमी पुरुष म्हणून नांवाजले आहेत. परंतु जे वीर पुरुष केवळ निःस्वार्थबुद्धीनें स्वदेशसेवा अंतःकरणापासून करीत राहतात आणि त्यांत येणाऱ्या दुःखांनीं डगमगत नाहींत तेच खरे वीरपुरुष होत आणि तेच खरे पूज्य होत. प्रताप हा अशा उच्च कोटींतील वीर पुरुष होता. त्याचे पराक्रम, साहस वगैरे गुणांविषयीं आपण त्याची स्तुति करितों, परंतु त्यानें स्वदेशाप्रीत्यर्थ सर्वस्व अर्पण केलें आणि सुखसंपत्तीवर लाथ मारिली एवढ्याकरितां त्याला आपण जास्त पूज्य मानितों. प्रताप स्वर्गस्थ होऊन आज पांचशें वर्षें लोटून गेलीं आहेत; हिंदुस्थानाच्या राज्यकारभारांत अनेक

फेरबदल झाले आहेत, काळ बदलला आहे, तरी पण प्रताप आज सुद्धां आपल्या शुद्ध, स्वार्थरहित स्वदेशसेवेप्रमाणें स्वदेशसेवा करण्यास आपणास उत्तेजन देण्यास आपणासमोर जणूं काय उभाच आहे असें आपणांस वाटत आहे.



# श्रीसयाजी बालज्ञानमाला.



| छापेलां पुस्तकों. | किंमत. |
|---|---|
| १ गिरनारनुं गौरव ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ३ शरीरनो संचो ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ४ महाराणा प्रताप ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ५ कोषनी कथा ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ६ पाटण सिद्धपुरनो प्रवास ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| ७ पावागढ ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| ८ औरंगजेब ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ९ मधपुडो ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| १० रणजितसिंह ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| ११ सुखी घर ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| १३ सूर्यकीरण ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| १४ वातावरण ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| १५ ग्रहण (सचित्र) | ०—६—० |
| १६ बाल नेपोलियन | ०—६—० |
| १७ कोषकी कथा ( सचित्र ) ( हिन्दी ) | ०—८—० |
| १८ लोर्डोनी ओळा | ०—६—० |

| | | |
|---|---|---|
| १९ श्रीहर्ष | ( हिन्दी ) | ०–८–० |
| २० सिकंदरनी स्वारी | | ०–६–० |
| २१ सुरत | | ०–६–० |
| २२ एशियानी ओळखाण, भाग पहेलो | | ०–६–० |
| २३ भूस्तरनी कथा | | ०–६–० |
| २४ लॉर्ड विलियम बेन्टिक | | ०–६–० |
| २५ नाना फडनविस | | ०–६–० |
| २६ चंद्र | | ०–६–० |
| २७ वडोदरानो वैभव | | ०–६–० |
| २८ महादजी सिंधिया | | ०–६–० |
| २९ घरधोणी | | ०–६–० |
| ३० चांचड | | ०–६–० |
| ३१ पाचनक्रिया अने दूध | | ०–६–० |
| ३२ एशियानी ओळखाण, भाग बीजो | | ०–६–० |
| ३३ गर्भनी कथा | | ०–६–० |
| ३४ बाल बाबर | | ०–६–० |
| ३५ नाडीतंत्र | | ०–६–० |
| ३६ बौद्ध गुफाओ | | ०–६–० |
| ३७ महाबळेश्वर | | ०–६–० |
| ३८ हिंदुस्थाननुं वहाणवटुं | | ०–६–० |
| ३९ जाति अने ज्ञाति, भाग पहेलो | | ०–६–० |

| | | | |
|---|---|---|---|
| ४० | जाति अने ज्ञाति, भाग बीजो | | ०–६–० |
| ४१ | विलियम युवर्ट ग्लॅडस्टन | | ०–६–० |
| ४२ | शूरवीर शिवाजी | (सचित्र) | ०–६–० |
| ४३ | आरोग्यता | ( हिन्दी ) | ०–८–० |
| ४४ | दरियाकांठो | ( सचित्र ) | ०–६–० |
| ४५ | बरफ अने पाणी | | ०–६–० |
| ४६ | अर्थशास्त्रनी ओळखाण | | ०–६–० |
| ४७ | छत्रपति संभाजी | | ०–६–० |
| ४८ | महाराणा प्रताप | | ०–६–० |

